# नवभारत

वर्ष ५ वें ] फेब्रुवारी १९५२ [ अंक ५ वा



किंमत १ रुपया









नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मतांचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका





# दैवी संपत् चरित्र-माला

संपादक—श्री. दा. न. शिखरे, : श्री. आपटे गुरुजी



जगाच्या इतिहासांत दोन प्रवाह स्पष्टपणें दिसतात. एक स्वार्थी, भोगवादी व हिंसाप्रधान. इतरांना जिंकून, लुबाडून, गुलाम बनवून त्यांचेवर आपली सत्ता चालवावी, अशा महत्त्वाकांक्षेचे पराक्रमी व सामर्थ्यशाली पुरुष इतिहासांत आढळतात; किंबहुना त्यांनीं चालविलेल्या लढाया, त्यांनीं केलेल्या कत्तली, त्यांनीं घडविलेले रक्तपात यांनींच इतिहासाचीं बरींचशीं पानें रंगलेलीं असतात.

पण समाजाची जी धारणा होते व मानवजातीची जी प्रगति होते, ती दुसऱ्या कोटींतील थोर लोकांकडूनच. अभय, सत्य, दया, क्षमा, शान्ति, तेज इत्यादि दैवी संपत्तीच्या विभूतीच मानवांना प्रेमाचा व ऐक्याचा मार्ग दाखवितात. स्वतःला दिसलेलें सत्य स्थापण्यासाठीं व अन्यायाचें निर्दाळण करण्यासाठीं ते मूकपणें जनतेची सेवा करीत राहतात—अवश्य तर, त्या कामीं आत्म-बलिदानहि करतात. अशा पुरुषोत्तमाची ओळख प्रचलित इतिहासांतून फारच थोडी करून दिली जाते.

ती ओळख महाराष्ट्रीय वाचकांना यथाशक्य प्रमाणांत करून द्यावी, या हेतूनें "दैवी संपत् चरित्र-माला" काढलेली आहे पृथ्वीच्या पाठीवरील सर्व देशांतील व सर्व धर्मांतील प्रेमपूर्ण व सेवाशील स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील उदात्त कथा या 'मालें'त दिल्या जातील. साधारणपणें प्रत्येक पुस्तकांत अशा आठ अहिंसक संतांचीं चरित्रें असतील व अशीं एकूण बारा पुस्तकें निघतील.

कवि श्री. बा. भ. बोरकर, 'आनंद' कर्ते श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. दे. ना. टिळक, श्री. काकासाहेब बर्वे इत्यादि लेखन-साहाय्य करणार आहेत. पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. हें शंभर पृष्टांचें असून त्याची किंमत एक रुपया आहे.











मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेऱ्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखेपूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत',
२९१ शनिवार, पुणें २

# जाहिरातींचे दर

| | संबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळा | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २





सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष पांचवें
अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी
१९५२

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष पांचवें
अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी
१९५२

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# 'नवभारत', फेब्रुवारी १९५२

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख 'नवभारतां'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**श्री. के. वि. गोडबोले** बी. ए., एलएल्. बी. ( पुणें )— पूर्वींच्या फलटण संस्थानचे दिवाण. 'जातिनिर्मूलनसंस्थे'चे निष्ठावंत कार्यवाह. 'महाराष्ट्र-शाकुन्तला'चे कर्ते.

**श्री. वि. ग. जोशी** एम्. ए. ( चिपळूणकर प्राइझ्मन )— पुणें येथील लॉ कॉलेजमध्यें द्वितीय वर्षाचे विद्यार्थी.

**प्रा. वसन्त कानेटकर**— नाशिक येथील हं. प्रा. ठा. महाविद्यालयांत मराठी व इंग्रजी या विषयांचे प्राध्यापक. 'घर' या कादंबरीचे लेखक.

**प्रा. राजाराम भालचंद्र पाटणकर**— भावनगर येथील एम्. जे. कॉलेज ऑफ कॉमर्समध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**कु. चं. श्री. कर्नाटकी** एम्. ए., बी. टी., टी. डी. ( लंडन )— पुणें येथें 'इन्स्पेक्ट्रेस ऑफ गर्ल्स स्कूल्स.'

**प्रा. ह. श्री. शेणोलीकर**— बेळगांव येथें लिंगराज कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक.

**श्री. वि. के. महाबळेश्वरकर**— हिंगणें येथील महिलाश्रम हायस्कूलमध्यें शिक्षक. 'रामायणसौन्दर्यम्' या पुस्तकाचे कर्ते.

**महामहोपाध्याय द. वा. पोतदार**— सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक आणि शिक्षणशास्त्रज्ञ. त्यांचा लेखसंग्रह 'दत्तो वामन पोतदार : वाङ्मयदर्शन' हा प्रसिद्ध आहे.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

श्री. के. वि. गोडबोले

# वर्ण व जाती : भगवद्गीतेंतील चातुर्वर्ण्याचें स्वरूप

[ प्रस्तुत लेखकानें ' नवभारता 'च्या एप्रिल १९५१ च्या अंकांत ' वर्ण व जाती यांची उत्पत्ति आणि त्यांचें प्राचीन इतिहासपूर्व स्वरूप ' असा एक लेख लिहिलेला आहे. त्या लेखांत, श्रीमद्भगवद्गीतेंत ' चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः । ' ( अ. ४ श्लो. १३ ) असें जें वचन आहे तें, चातुर्वर्ण्याची जन्मावर घसरलेली गाडी गुणकर्मांच्या रुळावर आणण्यासाठीं श्रीकृष्णानें घोषित केलें, असें म्हटलें होतें. वर्ण हे जन्मसिद्ध नसून गुणकर्मसिद्ध आहेत हा सिद्धांत या वचनानें खरोखरी सूचित केला आहे. परंतु हा वरील श्लोकार्धाचा अर्थच पुष्कळांना मान्य नाहीं. म्हणून या श्लोकाच्या अर्थाची अधिक चर्चा प्रस्तुत लेखांत केली आहे. ]

वर्णव्यवस्थेचें हिंदुस्थानांतील वैशिष्ट्यपूर्ण स्वरूप क्षणभर बाजूला ठेवलें, तरी मनुष्यांची वांशिक, धार्मिक, सामाजिक, औद्योगिक वा राजकीय कारणास्तव वर्गवारी, ही गोष्ट जगांतील अनेक भागांत अपरिचित होती असें नाहीं. भूतकालीन इजिप्तमध्यें, रोमन साम्राज्यांत, तसेंच मादागास्कर, आफ्रिका, फिजी व बर्मा इत्यादि देशांत अशी वर्गवारी अस्तित्वांत होती. त्या प्रत्येक वर्गवारीचें हिंदुस्थानांतील वर्णव्यवस्थेशीं वा जातिव्यवस्थेशीं कमीअधिक प्रमाणांत साम्य होतें. परंतु हिंदुस्थानांत त्या व्यवस्थेचें जसें स्वरूप आढळून येतें व तिची जशी परिणति दिसते, तो प्रकार मात्र इतरत्र कोठेंहि सांपडणार नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, जाती गीताकाळीं अस्तित्वांत आलेल्या असल्या, तरी त्यांची बेसुमार वाढ मात्र त्यानंतरच्या काळांतील आहे. तेथवर समाजव्यवस्थेंत जें स्थान वर्णांना होतें तें जातींना नव्हतें. परंतु वर्णालाच जात म्हणून संबोधिलें जाण्याला व एका वर्णाच्या अनेक जाती होण्याला सुरुवात मात्र गीताकाळीं झाली होती. वर्ण जन्मावर अधिष्ठित होणें याचा अर्थच वर्णांचें जातींत ( जन्–धातु ) रूपांतर होणें अगर वर्णांना जातींचे फांटे फुटणें, हा होय. तथापि वर्णांचें काय किंवा जातींचें काय, हें जन्माधिष्ठितत्वच तात्कालिक व पुढील अनर्थांचें मूळ होतें. केवळ अंगच्या गुणांमुळें एकाला उच्च व दुसऱ्याला नीचपद मिळालें तर आपणांस तें सकारण वाटतें, त्याच्यामागें कांहीं तरी युक्तिवाद वाटतो. पण तोच उच्चनीचभाव जन्मामुळें म्हणजे अकारण उत्पन्न झाला, म्हणजे तो ' सर्वभूतहिता 'ला व अर्थातच सत्याला विरोधी वाटतो. ' सर्वत्र समदर्शन ', ' आत्मौपम्य ' वगैरे तत्त्वांचा पुरस्कर्ता जो श्रीकृष्ण त्याला या कारणानें अशी विषमतामूलक वर्णव्यवस्था मान्य होण्याजोगी नव्हती. मुळांत म्हणजे वैदिक व औपनिषदिक काळांत ती तशी म्हणजे जन्मावर आधारलेली नव्हती, ही त्याची खात्री होती. परंतु याचा लोकांना विसर पडून दरम्यानच्या काळांत हा बनाव झाला होता. यास्तव श्रीकृष्णानें गुणकर्माधिष्ठित वर्णव्यवस्थेचा पुनरुद्धार करण्याचा प्रयत्न केला. म्हणून या लेखांत फक्त गीतेंतील चातुर्वर्ण्याच्या स्वरूपाचाच तेवढा विचार करण्याचें योजिलें आहे.

' चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ' या श्लोकार्धाचा अर्थ ' गुणानुरूप कर्मांची वांटणी करून त्या अनुरोधानें चातुर्वर्ण्य मीं स्थापिलें ' असा आहे








व त्याबद्दल फारसा मतभेदहि नाहीं. यावरून गुणकर्म हें चातुर्वर्ण्योत्पत्तीचें कारण, साधन किंवा आधार आहे असा साहजिकच बोध होतो; आणि गुण पाहून वर्ण ठरविणें याचा अर्थ व्यक्तींचे गुण पाहून त्यांचे वर्ण ठरविणें, एवढा एकच संभवतो. परंतु, तो सोडून कोणाहि व्यक्तीचा वर्ण त्याच्या जन्मावरून गृहीत धरून मग त्या वर्णाला विदित असलेलीं गुणकर्में त्याच्यावर लादणें अगर तीं त्याचा स्वधर्म ठरविणें, असा त्या श्लोकार्धाचा अर्थ पुष्कळांकडून केला जातो. वरील पहिल्या अर्थाप्रमाणें गुणकर्म हें वर्णाचें कारण अथवा अधिष्ठान ठरतें, तर दुसऱ्या अर्थाप्रमाणें वर्ण हे गुणकर्माचें कारण अथवा अधिष्ठान ठरतात. पहिल्या व आम्हांस संमत असलेल्या अर्थाप्रमाणें वर्ण हे प्रत्येक व्यक्तीच्या प्रवृत्तीवरून ठरावयाचे असतात, म्हणून ते प्रवृत्तिसिद्ध म्हणतां येतील; उत्पत्तिसिद्ध अगर जन्मसिद्ध म्हणतां येणार नाहींत. दुसरा अर्थ स्वीकारल्यास त्याच्याउलट स्थिति होईल.

## पुरातन अमृत नव्या चषकांतून

गीतेच्या श्लोकाचा सरळ जो अर्थ होतो तो आम्हीं सांगितला आहे. परंतु लोकमान्य टिळकांनीं 'गीतारहस्यां'त अधिकारवाणीनें सूचित केल्याप्रमाणें गीतार्थ हा सांप्रदायिकांच्या व पारंपरिकांच्या कचाट्यांत सांपडून अनेक प्रकारें विपर्यस्त व विकृत झाला आहे. त्याचाच अनुभव याहि श्लोकाच्या बाबतींत येतो असें म्हणणें भाग आहे. यासंबंधांत प्रथम जी गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे ती ही कीं, 'गीता' हा एकादा मामुली धार्मिक ग्रंथ नाहीं. त्यांत, मुख्य सिद्धांताच्या विवेचनाच्या अनुषंगानें जरी त्याला पोषक अगर प्रासंगिक अशा अनेक गोष्टींचें वर्णन आलें असलें, तरी त्यांतील मुख्य मुख्य तत्वांच्या प्रतिपादनांत कांहीं तरी नावीन्य अगर वैशिष्ट्य असणें हेंच युक्त व क्रमप्राप्त होय. लोकमान्य टिळकांनीं 'गीतारहस्य' या ग्रंथाच्या आरंभींच्या 'विषयप्रवेश' या प्रकरणांत "कोणताहि ग्रंथकार आपणांस कांहीं नवें सांगणें असल्याखेरीज प्रायः नवीन ग्रंथ लिहिण्यास प्रवृत्त होत नाहीं" असें जें म्हटलें आहे, तें फार विचारार्ह आहे. सामान्य ग्रंथाबाबतींत देखील जी गोष्ट सहसा घडत नाहीं, ती गोष्ट गीतेच्या बाबतींत कशी संभवनीय असेल? गीतेंत सांगितलेलें सर्वच नवें नसणार हें उघड आहे. परंतु पूर्वींच्या सिद्धांतांशीं जेथें भगवंतांचा पूर्ण विरोध होता तेथें त्यांनीं कोणाचीहि—वेदांचीहि—पर्वा न करतां तसें स्पष्ट म्हणण्यास कसूर केलें नाहीं, हें 'यावानर्थ उदपाने' व 'वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः' वगैरे गीतेंतील वचनांवरून सिद्ध असल्याचें मागील लेखांत आम्हीं दाखविलेंच आहे. परंतु पूर्वीं मान्यता पावलेलीं तत्त्वें कालाच्या ओघांत निरनिराळ्या कारणांनीं विस्मृत वा विकृत होणें अगदीं साहजिक होतें. म्हणून सर्वस्वीं नवीन असें कांहीं सांगण्यापेक्षां जेथें जरूर वाटलें तेथें अशी विस्मृति व विकृति दूर करून, वैदिक व औपनिषदिक तत्त्वज्ञान मूळच्या उज्ज्वल स्वरूपांत मांडण्यासाठीं गीताशास्त्राची प्रवृत्ति मुख्यतः झाली, ही गोष्ट जरा बारीक व खोल दृष्टीनें अभ्यास करणाऱ्याच्या तत्काल लक्षांत येईल. थोडें आलंकारिक भाषेंत बोलावयाचें, तर नव्या चषकांतून पुरातन अमृत गीतेच्याद्वारें जनतेला भगवंतांनीं पाजलें असें म्हणणें वस्तुस्थितीला अधिक धरून होईल. चातुर्वर्ण्याची पुनर्व्यवस्था ही अशांतलीच एक बाब होती. चातुर्वर्ण्य ही गीतेच्या कालीं एकादी नवीन उत्पन्न झालेली चीज नसून, गीतेच्या कालापूर्वीं ती दीर्घकाल अस्तित्वांत होती. परंतु चातुर्वर्ण्याच्या वेद-व-उपनिषत्कालीन उपपत्तींत व व्यवस्थेंत गीताकालापर्यंत मोठें परिवर्तन घडून आलें होतें. कोणाहि व्यक्तीच्या गुणांवरून त्याचा वर्ण ठरविला जाण्याऐवजीं जन्मावरून त्याचा वर्ण ठरविला जाऊन त्या वर्णाचीं गुणकर्में त्याला चिकटविण्यांत, किंबहुना त्याच्यावर तीं लादण्यांत येऊं लागलीं होतीं, हें उपरिनिर्दिष्ट मागील लेखांत, रामायणकालीन शंबूकाच्या व महाभारतकालीन एकलव्याच्या गोष्टींवरून स्पष्ट केलेंच आहे. परंतु जन्माच्या 'अपघाता'वरून मनुष्य एवंगुणविशिष्ट आहे असें कल्पिणें आणि तदनुरूप कर्में त्यास आंखून देणें व त्या आधारें त्याची योग्यता कमीअधिक ठरविणें हें 'सर्वत्र समदर्शन'-वादी, 'आत्मौपम्य'-वादी व 'सर्वभूतहित' वादी गीताकार श्रीकृष्णाला मान्य होणें शक्य नव्हतें हें वर दिग्दर्शित केलेंच आहे. कारण








# वर्ण व जाती : भगवद्‌गीतेंतील चातुर्वर्ण्याचें स्वरूप

सर्वश्रेष्ठ असें जें 'सत्य'-तत्त्व तें व 'सर्वभूतहित'-तत्त्व हीं दोन्ही वास्तविक कशीं एकच आहेत हें मागील लेखांत आम्हीं दाखविलेंच आहे. म्हणून जन्मासारख्या आगंतुक व यदृच्छाप्राप्त गोष्टीवर माणसामाणसांत फरक करणें हें 'समदर्शन' व 'सर्वभूतहित' या तत्त्वांना आणि अर्थातच सत्यालाहि विरोधी झालें असतें. म्हणून श्रीकृष्णानें चातुर्वर्ण्य पुन्हां मूळच्याप्रमाणें गुणकर्मांवर अधिष्ठित करण्याचा प्रयत्न केला. तसें नसतें व गीताकालीं जन्मावर रूढ झालेलें चातुर्वर्ण्याचें स्वरूप गीतेस संमत असतें, तर तें 'गुणकर्माधारें मीं निर्माण केलें' अशा प्रकारच्या स्वकर्तृत्ववाचक व अभिनिवेशपूर्ण भाषेंत त्याची घोषणा करण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. कारण चातुर्वर्ण्य हें सर्वांना आधींच पूर्ण परिचित होतें. विसर पडला होता तो फक्त चातुर्वर्ण्य व गुणकर्म यांतील कार्यकारणभावाचा. म्हणून तो कार्यकारणभाव प्रस्थापित करण्यासाठीं ही घोषणा श्रीकृष्णांनीं केली. या कार्यकारणभावाचा अपरिचितपणा अगर विस्मृति नष्ट करणें व पुन्हां चातुर्वर्ण्य मूळ पदावर आणणें हा वरील श्लोकार्धांतील घोषणेचा उद्देश होता. त्यास प्रत्यंतर म्हणून ज्या चवथ्या अध्यायांत 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः' हा श्लोकार्ध आला आहे त्या अध्यायाच्या प्रारंभींचे तीन श्लोक विशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत. ते असे :

'इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥
एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥
स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥'

या तीन श्लोकांत "'योग' (कर्मयोग) मीं प्रथम विवस्वानाला म्हणजे सूर्यनारायणाला, विवस्वानानें आपला पुत्र मनु याला व मनूनें आपला पुत्र इक्ष्वाकु याला सांगितला. तथापि मध्यंतरीं दीर्घकाल लोटल्यामुळें तो योग नष्ट झाला व तोच आज मी तुला, तूं माझा भक्त व मित्र आहेस म्हणून सांगत आहे; कारण हें फार मोठें रहस्य आहे" असें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितलें आहे. आतां याच संदर्भानें पाहिलें म्हणजे 'परंपराप्राप्त चातुर्वर्ण्याची बैठक जें गुणकर्म, तेंहि दीर्घकाल दरम्यान लोटल्यामुळें नष्ट झालें होतें, तें मी पुन्हां प्रस्थापित करीत आहे' असा भगवंतांच्या 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः' या वचनाचा अर्थ आहे हें विचारांतीं कोणालाहि पटेल.

परंतु एका अध्यायांत थोड्याच अंतरानें हे श्लोक आले आहेत एवढ्याच कारणानें पहिल्याचा न्याय दुसऱ्याला लावणें बरोबर होईल काय, अशी शंका येणें साहजिक आहे. परंतु नुसत्या एवढ्याच कारणावर हा तर्क आधारलेला नाहीं. गीतेंत जो एक महान् सिद्धांत सांगितलेला आहे तो म्हणजे 'कर्मयोग'—फलाशारहित कर्म—हा होय. आतां या सिद्धान्ताचे साहजिकच दोन भाग पडतात. एक 'कर्म' व दुसरा 'योग' म्हणजे फलाशात्याग. यामुळें कर्मयोगांत जें विवक्षित आहे तें कर्म कोणतें व फलाशेचा त्याग म्हणजे काय या दोहोंचें गीतेंत प्रामुख्यानें विवेचन येणें अपरिहार्य होतें. यामुळें गीतेंत प्रतिपादन केलेला 'योग' कोणता हें चवथ्या अध्यायाच्या प्रारंभीं सांगितल्यानंतर ज्या कर्माच्या फलाशेचा त्याग करावयाचा तें कर्म कोणतें, हें सांगणें क्रमप्राप्तच होतें. म्हणून तें कर्म चातुर्वर्ण्यविहित कर्म होय हें सांगतांना, योगाप्रमाणेंच त्या चातुर्वर्ण्यामागील गुणकर्माच्या भूमिकेची झालेली विस्मृति नष्ट करून, चातुर्वर्ण्याची गुणकर्माधारें पुन्हां स्थापना गीतेंत प्रतिपाद्य असणें साहजिक होय. या वर्णविहित कर्मालाच 'स्वधर्म' अगर 'धर्म्य' कर्म, 'कार्य' कर्म अशा संज्ञा गीतेंत दिलेल्या आहेत. 'उपसंहार' या 'गीतारहस्यां'तील प्रकरणांत 'तुम्ही आपल्या योग्यतेनुरूप आपआपलीं सांसारिक कर्तव्यें लोकसंग्रहार्थ, निष्कामबुद्धीनें, आत्मौपम्यदृष्टीनें व उत्साहानें यावज्जीव करीत राहा असें गीताधर्म कंठरवानें सांगत आहे" असें वाक्य आहे. या वाक्यांतील अधोरेखित शब्दांचें महत्त्व आतांपर्यंत केलेल्या व पुढें येणाऱ्या विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईलच. तूर्त कर्मयोग व चातुर्वर्ण्य या दोहोंचीहि पुनःस्थापना

गीतेंत कशी विवक्षित आहे, एवढेंच दाखविण्याचा हेतु आहे.

## वर्ण जन्मसिद्ध मानणारे भाऊशास्त्री लेले

वरील विवेचनावरून, वर्णविहित कर्म हें धर्म्य, म्हणजे 'आत्मौपम्य'युक्त व 'समदृष्टि'युक्त असण्यास तें कशा प्रकारचें असावयास पाहिजे, याचें प्रतिपादन गीतेंत येथें आवश्यकच झालें. चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध मानलें तर तें समदृष्टीला प्रतिकूल ठरतें हें विशद करण्यांत आलेंच आहे. तथापि, असें असतां या श्लोकार्धाचा अर्थ चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध आहे असा करण्याकडे अनेकांचा कल आहे. महाराष्ट्रांत हा वाद वाईचे सुप्रसिद्ध विद्वान् कै. काशीनाथ वामन ऊर्फ भाऊशास्त्री लेले यांनीं प्रथम सुरू केला असावा असें दिसतें. कारण, मुंबईच्या ब्राह्मणसभेंत ता. ४-१२-१८९८ रोजीं त्यांनीं 'वर्णव्यवस्था उत्पत्तिसिद्ध आहे' या विषयावर व्याख्यान दिलें व तें एका पुस्तिकेच्या द्वारें प्रसिद्धहि केलें. त्यांत त्यांनीं "ब्राह्मणादि वर्ण उत्पत्तिसिद्ध नसून मनुष्याचे ठिकाणीं आढळून येणाऱ्या गुणांवर अथवा कर्मावर वर्णव्यवस्था अवलंबून आहे असें प्रतिपादन करणारे कांहीं लोक आहेत आणि भगवद्गीतेंतील 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः' हा श्लोकार्ध आपल्या म्हणण्याला प्रमाण देण्याचा प्रघात अलीकडे पडला आहे. तेव्हां या श्लोकाचा वास्तविक अर्थ काय होतो तो पाहिला पाहिजे" अशी प्रस्तावना केली आहे. वर्ण जन्मसिद्ध आहेत हा आपला दावा सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं जीं कारणें दिलीं आहेत त्यांच्या सयुक्तिकतेवरच त्यांच्या मताची सर्व किंमत अवलंबून असल्यामुळें त्या कारणांचा परामर्श घेतला पाहिजे. त्यांनीं दिलेलें पहिलें कारण, 'मया सृष्टं' ही शब्दयोजना 'वर्णव्यवस्था ईश्वरानें मानवांच्या बुद्धीवर अवलंबून ठेविलेली नाहीं' असें स्पष्ट दर्शविते, हें होय. परंतु 'सृज्' धातूचा 'जन्माला घालणें' अगर 'उत्पन्न करणें' असा जो अर्थ आहे तो एखाद्या योजनेच्या आंखणीच्या बाबतींतहि समर्पक आहे असें समजणें अयुक्त होय असें आम्हांस वाटतें. एखाद्या योजनेचा जनक एखादा गृहस्थ आहे असें म्हटलें, तर तें जनकत्व आलंकारिक अर्थानें असतें, वास्तविक नसतें, हें लक्षांत घेतलें पाहिजे. म्हणून 'सृष्ट' पदाचा येथें अर्थ, चार वर्णांची योजना अगर व्यवस्था मीं 'आंखली', 'सुरू केली' एवढाच आहे व असा अर्थ करणेंच युक्त होय. शिवाय पुढच्याच श्लोकार्धांत 'तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्' असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ विशद करतांना कै. सदाशिवशास्त्री भिडे यांनीं आपल्या 'गीतार्थ-रहस्यदीपिके'त "वर्णधर्मांमध्यें दिसून येणाऱ्या वैचित्र्यास ज्याचीं त्याचीं गुणकर्मे म्हणजे स्वभावच कारणीभूत होतात......म्हणूनच परमेश्वर या वर्णव्यवस्थेचा प्रत्यक्ष कर्ता होत नाहीं" आणि 'गुणकर्म' हें चार वर्णांतील भेदाचें कारण असल्यामुळें, "वर्ण-भेद नुसत्या जन्मानें किंवा परमेश्वराच्या रागद्वेषानें उत्पन्न होत नसून त्यांस ज्याचें त्याचें स्वाभाविक गुणकर्मच कारण आहे असें ठरतें" असें स्पष्ट लिहिलें आहे. यावरूनहि 'सृष्टं' या पदाच्या प्राथमिक धात्वर्थावरून काढलेला भाऊशास्त्री लेले यांचा तर्क संदर्भ व तात्पर्य या दोन्ही दृष्टींनीं किती असमर्थनीय आहे हें दिसून येतें.

कै. भाऊशास्त्री लेले यांनीं गीतेच्या १८ व्या अध्यायांतील श्लोक ४१ ते ४४ हेहि आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ पुढें केले आहेत. परंतु

> ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।
> कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥
>
> —(अ. १८. श्लो. ४१)

यांत ज्याच्या त्याच्या 'स्वभावजन्य गुणानुरूप चारी वर्णांतील लोकांचीं कर्मे वांटून दिलेलीं आहेत' असें म्हटलें आहे. यांत ज्याचे गुण ब्राह्मणत्वाला अनुकूल असतील तो ब्राह्मण, क्षत्रियत्वाला असतील तो क्षत्रिय या सिद्धान्ताला बाध आणणारें काय आहे? चारी वर्णांचे गुण सांगितले याचा अर्थ कोणती व्यक्ति कोणत्या वर्णांत पडते हें ओळखण्याचें साधन सांगितलें एवढाच आहे. वर्णांचा छाप जन्मानें मिळावयाचा व त्या वर्णाचे गुण त्या व्यक्तीला चिकटवावयाचे असा अर्थ त्यांतून कसा निघतो हें समजणें कठिण आहे. परंतु एवढ्यावरच न थांबतां लेलेशास्त्री यांनीं सत्यकाम जाबाल याची 'छांदोग्य








ब्राह्मणा 'च्या चवथ्या अध्यायांतील गोष्टच आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ दिली आहे, हें विशेष आश्चर्यकारक होय. ती कथा, श्रुतिकालीं जन्मावरून वर्ण ठरवीत नसत, असें दाखविण्याकरितां आम्हीं आमच्या मागील लेखांत दिली आहे. कै. डॉ. केतकर यांनींहि " या एका उदाहरणावरून पूर्वीच्या काळीं ब्राह्मणकुलांतील उत्पत्ति वगैरे गोष्टी किती क्षुल्लक समजत असत हें स्पष्ट होतें " असें 'ज्ञानकोश' प्रस्तावनाखंड, पान १६६ वर म्हटलें आहे. परंतु त्याच्याउलट 'जन्मावरून वर्ण ठरवीत' असा निष्कर्ष शास्त्रीबोवांनीं त्या कथेवरूनच काढला आहे. ती कथा थोडक्यांत अशी आहे : सत्यकाम हा आचार्यांकडे उपनयनार्थ गेला असतां त्यांनीं त्याला त्याचें गोत्र विचारलें. तेव्हां " माझी आई तरुण वयांत अनेक ठिकाणीं परिचर्या करीत हिंडत असतांना मी तिला झालों, यामुळें कोणाच्या कुळांत –किंबहुना कोणापासून– मी उत्पन्न झालों व माझें गोत्र कोणतें हें तिला माहीत नाहीं असें तिनें मला सांगितलें" असें सत्यकामानें आचार्यांना सांगितलें. त्याबरोबर आचार्य म्हणाले, " असें (सत्य) बोलणारा मुलगा ब्राह्मणाव्यतिरिक्त दुसरा कोणी असणें शक्य नाहीं;" म्हणून तत्काल त्यांनीं त्याला " तुझें उपनयन करतों कारण तूं सत्यापासून ढळला नाहींस (न सत्यादगा इति)" असें सांगितलें. सत्यकाम हा उघड उघड दासीपुत्र व बाप कोण याचाहि पत्ता नसलेला अशा प्रकारचा आहे हें माहीत झालें असूनहि, केवळ तो सत्य भाषण करणारा आहे एवढ्या त्याच्या एकाच गुणावरून त्याचा वर्ण ब्राह्मण आहे असें आचार्यांनीं ठरविलें. यावरून श्रुतिकालीं वर्ण गुणसिद्ध होते, जन्मसिद्ध नव्हते, याचा प्रत्यय ही कथा पूर्णपणें आणून देते, याबद्दल थोडीदेखील शंकेला जागा नाहीं. पण लेलेशास्त्री म्हणतात कीं, या कथेंत (श्रुतींत) 'गोत्र' शब्द आहे त्याअर्थीं आचार्यांचा हेतु सत्यकामाला त्याची जातच विचारण्याचा होता, असें दिसतें! पण शास्त्रीबुवांच्याच मनाला आपला हा तर्क सयुक्तिक वाटला नसावा म्हणून त्यांनीं आणखी एक तर्क रचला. तो असा कीं, आपणाकडे कोणी पाहुणा आला तर त्याला पंक्तीला घ्यावा कीं नाहीं असा आपल्याला प्रश्न पडतो व त्याला जात विचारली असतां त्याला अपमान वाटण्याचा संभव असतो. म्हणून आपण त्याला 'तुम्ही देशस्थ का कोकणस्थ, ऋग्वेदी का आपस्तंब?' असें विचारतों. तशाच दृष्टीनें सत्यकामाला जात न विचारतां गौतम ऋषींनीं गोत्र विचारलें असावें, पण वस्तुतः त्यांना त्याची जातच विचारावयाची होती, असें विलक्षण अनुमान त्यांनीं काढलें आहे! पण या बाबतींत हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, सत्यकाम हा आचार्यांचा पाहुणा नव्हता तर त्यांजकडे विशिष्ट धार्मिक संस्कार करून घेण्याची याचना करण्यास आलेला एक गरीब मुलगा होता. अशा वेळीं त्याचें गोत्र विचारणें कोणत्याहि दृष्टीनें अनुचित नव्हतें. तथापि, आचार्यांचा स्वभाव अतिकोमल आणि सर्वांना अतिरिक्त सन्मानानें वागविण्याचा होता असें वादाकरितां क्षणभर मानलें, तरी जबाला व सत्यकाम या आईमुलांत तर कांहीं आडपडदा, संकोच अगर मानसन्मान असले प्रश्न उद्भवणें शक्य नव्हतें ना? परंतु असें असून मुलानें आईला " किंगोत्रो न्वहमस्मीति " (मी कोणत्या गोत्राचा आहे?) असेंच विचारलें व आईनें पुन्हां 'गोत्र' शब्दाचाच उच्चार करून सांगितलें कीं, " नाहमेतद्वेद तात यद्गोत्रस्त्वमसि (बाबा रे, कोणत्या गोत्राचा तूं आहेस हें मी जाणत नाहीं)! " म्हणजे प्रश्नांत व उत्तरांत दोघांनींहि 'गोत्र' शब्दच वापरला आहे. यावरून शास्त्रीबुवांनीं काढलेली पाहुण्याची क्लृप्ति जागच्या जागींच जिरते हें सहज लक्षांत येईल. शिवाय त्यांच्या म्हणण्याला दुसरी अडचण अशी कीं, गोत्रावरून ब्राह्मण कीं क्षत्रिय हेंहि कळलेंच असतें असेंहि नाहीं. कारण पुष्कळ ब्राह्मणांचीं व क्षत्रियांचीं गोत्रें एकच असत. स्वतःच्या हिताला बाधक असलें तरी खरें सांगणारा मुलगा कोणाच्याहि पोटचा असला तरी गुणांमुळें त्याला ब्राह्मणच ठरविण्याची श्रुतिकालीं रीत होती, ही गोष्ट या कथेवरून अगदीं स्पष्ट आहे. यावरून त्या काळीं वर्ण जन्मसिद्ध नसून गुणसिद्ध होते हें उघड आहे.

### श्री. करंदीकरांचा श्रद्धामार्ग

शास्त्रीबुवांच्याच मताचे अगदीं अलीकडील








पुरस्कर्ते 'गीतातत्त्वमंजरी'चे सन्मान्य लेखक श्री. ज. स. करंदीकर हे होत. तथापि त्यांनीं गीतेंतील वादविषयक श्लोकार्धावर '-मंजरी'त टीका करतांना (पान १५९) "चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध असल्याची जशीं वचनें श्रुतींत सांपडतात तशींच तीं गुणकर्मसिद्ध असल्याचींहि वचनें सांपडतात" असें प्रांजलपणें मान्य केलें आहे. तथापि पुढें लागलींच ते म्हणतात कीं, "अशी उत्क्रांति झाल्यानंतर कांहीं कालानें ते वर्ण जन्मसिद्ध मानले जाऊं लागले व पुढें तर त्यांचें जातिसंस्थेंत रूपान्तर झालें. भारतीय युद्धकालाच्या पूर्वी हे वर्णभेद जन्मसिद्ध मानण्याला सुरुवात होण्याइतकें स्थित्यंतर घडून आलें असल्यानें गीतेंत चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध मानलें आहे."

श्री. करंदीकरांशीं आमचा मतभेद अधोरेखित भागापुरता आहे. गीताकालापर्यंत गुणसिद्धत्वापासून जन्मसिद्धत्वापर्यंत वर्णाचें झालेलें परिवर्तन त्यांना व आम्हांलाहि मान्य आहे. परंतु आमच्या मतें गीतेंत चातुर्वर्ण्य पुन्हां श्रुतिकालीन मूळपदावर आणण्याचा म्हणजे गुणसिद्ध करण्याचा महान् प्रयत्न करण्यांत आला ही गोष्ट मात्र त्यांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें झालेल्या परिवर्तनाचाच पुरस्कार गीतेंत करण्यांत आला. अर्थात् चातुर्वर्ण्य गुणकर्मावर आधारण्याचा आमच्या मतें गीतेंत जो प्रयत्न करण्यांत आला तो अनेक कारणांनीं यशस्वी झाला नाहीं हें आम्हीं आमच्या मागील लेखांत सूचित केलें होतें व पुढेंहि सिद्ध करणार आहों. पण तो भाग अगदीं निराळा आहे. गीतेंतील प्रतिपाद्य विषयाला त्यामुळें बाध येत नाहीं.

आतां "चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध असल्याचीं वचनें श्रुतींत सांपडतात" असें जें श्री. करंदीकरांनीं म्हटलें आहे, तें कोणकोणत्या विशिष्ट वचनांना अनुलक्षून लिहिलें आहे याचा खुलासा त्यांनीं केला नसला, तरी ऋग्वेदांत "विराट् पुरुषाच्या देहांतील निरनिराळ्या अवयवांशीं या वर्णांचा संबंध जोडला आहे" या त्यांच्या म्हणण्यावरून 'पुरुषसूक्तां'तील, (ऋचा १२)

'ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः।
ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत॥'

या व अशा प्रकारच्या इतर वचनांवर श्री. करंदीकरांचा भर असावा असें दिसतें. परंतु वर गीतेंतील 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' यांतील 'सृष्टं' शब्दाच्या वाच्यार्थावरून लेलेशास्त्री यांनीं जसें अनुमान काढल्याचें दाखविलें आहे तसाच कांहींसा प्रकार येथेंहि झाला असवा असें आम्हांस वाटतें. कारण श्रुतिवचन नुसतें लाक्षणिक आहे हें श्री. के. एम्. पणिक्कर (चीनमधील भारताचे वकील) यांनीं त्यासंबंधानें, "This (श्रुतिवचन), however, is only an allegorical interpretation of the functions performed by the four main castes and not a historical explanation as to how they originated." ('हें श्रुतिवचन निरनिराळ्या वर्णांच्या कर्मांचें केवळ लाक्षणिक वा रूपकमय वर्णन आहे, वर्णोत्पत्तीचें तें ऐतिहासिक विवरण नव्हे') असें जें म्हटलें आहे त्यावरून स्पष्ट आहे. शिवाय 'पुरुषसूक्तां'तील वरील ऋचेचा, ब्राह्मणादि वर्ण अनुक्रमें मुख, बाहू, मांड्या व पाय या विराट् पुरुषाच्या अवयवांपासून उत्पन्न झाले, असा जो अर्थ अनेक जुन्या भाष्यकारांनीं केला आहे व लेलेशास्त्री वगैरे अलीकडील पंडितांनींहि स्वीकारला आहे, किंबहुना जो सर्वमान्य सिद्धान्तच समजला जातो, तो अर्थ आमच्या अल्पबुद्धीला त्या ऋचेंतील शब्दयोजनेच्या दृष्टीनें विचार करतां वस्तुस्थितिनिदर्शक व यथार्थ वाटत नाहीं. शूद्र पज्ज म्हणजे पायापासून उत्पन्न झाले, असें वरील वचनांत म्हटलें आहे हें खरें. पण बाकीचे तीन वर्ण हे अनुक्रमें परमेश्वराचें मुख, बाहू व ऊरू आहेत असें नुसतें म्हटलें आहे. या तीन अवयवांपासून हे तीन वर्ण उत्पन्न झाले असें विधान वरील ऋचेंत केलेलें नाहीं. यावरून ऋचेच्या शेवटच्या पादाचा अर्थ पहिल्या तीन पादांच्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला दिसतो. पण असा लाक्षणिक अर्थच जर काढावयाचा असेल, तर पहिल्या तीन पादांच्या अनुरोधानें चौथ्याचा अर्थ लावणें अधिक युक्त ठरेल. म्हणजे शूद्र हेहि पायापासून उत्पन्न झाले नसून ते परमेश्वराचे पाय होत असा अर्थ करणें युक्त होईल. तो कोणी स्वीकारो वा न स्वीकारो—पहिले तीन वर्ण मुखज, बाहुज व ऊरुज म्हणणें मात्र कदापि बरोबर होणार नाहीं. शिवाय








आमच्या या म्हणण्याला त्या सूक्तांतच एक प्रमाण आहे. तें म्हणजे 'पुरुषसूक्तां'तील या ऋचेच्या आधींचीच ऋचा हें होय. त्या ऋचेचा विचार केला तरं आमचा हा तर्क साधार आहे असें लक्षांत येईल. ती ११ वी ऋचा अशी :

"यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन्।
मुखं किमस्य कौ बाहू का ऊरू पादा उच्येते॥"

('ज्या वेळीं विराट् पुरुष निर्माण करण्यांत आला त्या वेळीं त्याचा किती प्रकारें आविष्कार करण्यांत आला? त्याचें मुख कोण झालें? त्याचे बाहू, मांड्या व पाय कोणाला म्हणावयाचें?'). येथेंहि, पायापासून कोण उत्पन्न झालें असा प्रश्न केलेला नसून पाय कोण झालें असा केलेला आहे, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. आमच्या मतें ही शब्द-योजना अहेतुक खास नाहीं. असो. श्री. करंदीकरां-च्या मताचा बराचसा भाग आमच्या मताशीं जुळता आहे हें आम्हीं वर लिहिलेंच आहे. परंतु गीतेंतहि जन्मसिद्ध चातुर्वर्ण्याचा पुरस्कार केला आहे ही गोष्ट मात्र आम्हांस मान्य नाहीं. 'स्वभावप्रभव गुण', 'स्वभावनियत', 'सहज', 'प्रकृतिज' वगैरे शब्दांनीं श्री. करंदीकरांची व इतर पुष्कळांची दिशाभूल झालेली आहे असें आम्हांस वाटतें. व्यक्तीच्या अंगच्या गुणांवरून त्या व्यक्तीला वर्णाचा शिक्का देतांना त्या व्यक्तीच्या उपजत व स्वाभाविक गुणांना केव्हांहि प्राधान्य मिळणारच. पण म्हणून गुणांवरून व्यक्तीची जात अगर वर्ण ठरविणें हें उचित होय या प्रतिपादनाला काय हरकत येते हें समजणें कठिण आहे. कांहीं विशिष्ट गुणांनीं युक्त ते ब्राह्मणवर्गांत पडणार. दुसऱ्या कांहीं गुणांनीं युक्त असतील ते दुसऱ्या वर्गांत पडणार. त्यामुळें ब्राह्मणादि वर्णांचें वर्णन करतांना अमुक गुण अंगीं असणाऱ्या व्यक्तींचा समुच्चय असें होणारच. गीतेच्या १८ व्या अध्यायांतील श्लोकचतुष्टय याहून अन्य काय दर्शवितें? शम, दम इत्यादि 'ब्रह्मकर्म स्वभावजम्' म्हणजे 'ब्राह्मणाचें उपजत कर्म असतें' याचा अर्थ ब्राह्मण आई-बापांच्या पोटचा मुलगा असला कीं त्याचें हें कर्म ठरतें असा कसा होईल? उलट शमदमादि उपजत गुण असलेला मुलगा ब्राह्मण वर्णांत पडेल व तेच त्या वर्णाचे विहित गुण असल्यानें त्या गुणांना अनुरूप कर्में त्यानें केलीं पाहिजेत असा गीतेचा दंडक आहे व तसा असण्यास कांहींहि प्रत्यवाय दिसत नाहीं.

या वादांतील आमची भूमिका, शंकेला थोडीसुद्धां जागा न राहील इतकी, स्पष्ट करणें अवश्य वाटतें. व्यक्तीच्या अंगचे गुण पुष्कळ अंशीं जन्मसिद्ध असूं शकतात हा वादाचा प्रश्न नाहीं; व त्या गुणांवरून त्या व्यक्तीचा वर्ण ठरावयाचा हाहि वादाचा प्रश्न नाहीं. आईबापांच्या वर्णाप्रमाणें संततीचा वर्ण ठरावयाचा व त्या वर्णाचीं गुणकर्में संततीमागें 'स्वभावज' म्हणून लावावयाचीं, असा अर्थ मागील परिच्छेदांत उल्लेखिलेल्या कोणत्याहि विशेषणांतून निघणें शक्य नाहीं व तसें गीतेंत कोठेंहि सांगितलेलें नाहीं, एवढेंच आमचें म्हणणें. व्यक्तीचे गुण जन्मसिद्ध असण्याऐवजीं, वर्ण जन्मसिद्ध असतात असा अर्थ त्या विशेषणांतून काढतात त्यास मात्र गीतेंत कांहीं आधार नाहीं, असा आमचा दावा आहे. हा सूक्ष्म भेद लक्षांत घेतला तरच या वादाचें खरें स्वरूप लक्षांत येईल. गीतेची उपपत्ति सोडली तर मात्र वर्ण जन्मसिद्ध होते ही गोष्ट मान्य आहे. तसेंच गीतेच्या व महाभारताच्या कालीं व त्या कालाच्या आधींहि वर्ण जन्मसिद्ध मानण्याची पद्धत रूढ झाली होती हीहि गोष्ट आम्हांस मान्य आहे.

आतां यासंबंधांत हें सांगणें जरूर आहे कीं, वर्ण हे प्रवृत्तिसिद्ध आहेत असें जें आमचें म्हणणें आहे त्याचा अर्थ ज्या वेळीं ज्याला जी लहर येईल ती त्याची प्रवृत्ति, असा अर्थातच नाहीं. परंतु आमच्यासारखें मत धारण करणाऱ्यांच्या म्हणण्याचा असा विपरीत अर्थ करून, अर्जुनाला युद्धारंभीं जो विषाद अगर दया उत्पन्न झाली तीच त्याची प्रवृत्ति असल्यामुळें त्याप्रमाणें वागणें हा त्याचा स्वधर्मच ठरला असता आणि मग त्याला 'ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि।' असें म्हणण्याचें श्रीकृष्णाला कारणच पडलें नसतें, असा अनवस्थाप्रसंग, वर्ण प्रवृत्तिसिद्ध असतात असें म्हणणाऱ्यांच्या पदरीं बांधण्याचा तद्विरुद्ध मताच्या लोकांचा प्रयत्न दिसतो. परंतु अर्जुनाच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या विषादासारख्या क्षणिक अगर








तात्कालिक वृत्तीला 'स्वभाव' हें नांव कोणीहि देणार नाहीं. प्रवृत्तिसिद्ध यांतील 'प्रवृत्ति' शब्दाचा अर्थ 'टिकाऊ प्रवृत्ति' असाच आहे. तींत स्थायी भाव अपेक्षित असतो. पण एकांतिक नित्यता अपेक्षित असते असें मात्र नाहीं. यामुळेंच एखाद्याच्या स्वभावांत वैचारिक व टिकाऊ फरक झाला तर अशा व्यक्तीचा वर्णहि त्याच जन्मीं बदलूं शकेल यांत शंका नाहीं.

श्री. करंदीकर हे फार विचारी गृहस्थ असल्यानें त्यांना स्वतःच्याच ( गीतेंत जन्मसिद्ध वर्ण अभिप्रेत आहेत या ) मताबाबत अगदीं पूर्ण असंदिग्धता वाटत नसावी, हें त्यांच्या खालील प्रश्नावरून दिसतें : "ईश्वरानें जर जन्मजात चातुर्वर्ण्य ठरवून टाकलें तर मग तें चातुर्वर्ण्य गुणकर्मानुवर्ती आहे असें कसें म्हणतां येईल?" (गी. मं.–पा. ८१८). परंतु या शंकेचें निरसन बुद्धिवादी मार्गानें करणें त्यांना अवघड झाल्यामुळें श्रद्धेचा मार्ग स्वीकारून मानीव कारणावर भिस्त ठेवणें त्यांना भाग पडलें व तो मार्ग त्यांना प्रशस्त वाटत असल्यानें त्याची कास त्यांनीं धरली आणि, "या (वरील) शंकेचें समाधान गुणकर्मांचा संबंध जन्मानुरूप जडतो असें मानल्यानेंच होऊं शकतें व ही कल्पना गीतेंत गृहीत धरली आहे. म्हणजे ज्याचें गुणकर्म ज्या वर्णाला जुळण्यासारखें असेल त्या वर्णांतच तो जन्माला येणार; युद्धाची हौस असणारा क्षत्रिय-कुलांत आणि तपश्चर्येची हौस असणारा ब्राह्मण-कुलांतच जन्मणार असा अभिप्राय दिसतो; आणि असा जन्म येणें हेंच नैसर्गिक दिसतें....ज्यानें विशिष्ट वर्णांत जन्म घेतला त्याच्या अंगीं त्या वर्णाचे गुण आहेत असें समजावें हाच स्वाभाविक निष्कर्ष होय," असें ('गीतामंजरी'तील 'गीतेंतील चातुर्वर्ण्याचें स्वरूप' या प्रकरणाच्या ८१८-१९ पानावर ) त्यांनीं लिहिलें आहे. वास्तविक श्री. करंदीकर यांना उपरिनिर्दिष्ट शंका आली ती बरोबर आहे. परंतु पुरुषसूक्तांतल्या 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' या वचनाच्या वाच्यार्थाशीं त्यांच्या मतें गुणकर्मानुवर्ती वर्णव्यवस्थेचा मेळ बसेना. यामुळें त्यांनीं ( गीतेंत तसें सांगितलें नसलें तरी ) गुण-कर्मांचा संबंध जन्माशीं असलाच पाहिजे असें श्रुतिवचनावरील आपल्या श्रद्धेच्या जोरावर ठरवून व गीतेचा तोच अभिप्राय आहे हेंहि गृहीत धरून स्वतःचें समाधान करून घेतलें. तथापि, त्यांच्या श्रद्धेला 'पुरुषसूक्तां'तील वर्णनाबरोबरच खालील वचनेंहि कारणीभूत झालीं असावींत असें वाटतें. पहिलें वचन सूतसंहितेंतील आहे, तें असें :

> 'सर्वेषां जन्मना जातिर्नान्यथा कर्मकोटिभिः ।
> पश्वादीनां यथा जातिर्जन्मनैव न चान्यथा ॥'

( अर्थः—ज्याप्रमाणें पशुपक्षी वगैरेंची जात दुसऱ्या कशानेंहि न ठरतां एकट्या जन्मानेंच ठरते, त्याचप्रमाणें सर्वांची जात जन्मानेंच ठरते. कोट्यवधि कर्मांनींदेखील ती बदलूं शकत नाहीं. ) तसेंच 'पराशरस्मृतीं'त पुढील वचन आहे :

> 'दुःशीलोऽपि द्विजः पूज्यो न तु शूद्रो जितेंद्रियः ।
> कः परित्यज्य गां दुष्टां दुहेच्छीलवतीं खरीम् ॥'

( अर्थः—दुराचरणीदेखील ब्राह्मण पूज्य होय, परंतु संयमी शूद्र मानाला कधींहि पात्र होणार नाहीं. कारण गाय वाईट असली तरी तिला टाकून चांगल्या व गरीब गाढवीचें दूध कोण काढील ? ) अर्थात् हीं व अशीं वचनें ज्या भाषेंत लिहिलेलीं आहेत ती भाषा श्री. करंदीकरांसारख्या सुसंस्कृत गृहस्थांस पसंत पडण्याजोगी नसल्यामुळें त्यांनीं त्यांचा प्रत्यक्ष आधार घेतला नाहीं हें खरें. परंतु लेलेशास्त्री हे भाषेच्या विधिनिषेधाविषयीं विशेष पर्वा करणारे नसल्यानें त्यांनीं आपल्या उपरिनिर्दिष्ट ब्राह्मणसभेंतील व्याख्यानांत अशा प्रकारचीं वचनें प्रमाण मानून शेवटीं "लहानशी गाडी ओढणारे एडके ज्याप्रमाणें बैल या संज्ञेस पात्र होणार नाहींत व कमकुवत असलेल्या बैलांची गणना जातीच्या संबंधानें विचार केला असतां एडक्यांत करणें योग्य होणार नाहीं अथवा पेंड खाणाऱ्या घोड्याची गणना ज्याप्रमाणें बैलांत करणें उचित नाहीं, त्याचप्रमाणें शम्बूकासारख्या एखाद्या शूद्रजातीय मातापितरांपासून उत्पन्न झालेल्या पुत्राला तपश्चर्या करण्याची इच्छा झाल्यास त्यालाहि ब्राह्मणांच्या सदरांत घालणें योग्य होणार नाहीं," अशा शेलक्या शब्दांत आपला अभिप्राय त्यांनीं व्यक्त केला आहे !








श्री. करंदीकर हे श्रद्धेचे भोक्ते असले तरी "प्रस्तुत काळीं जन्मसिद्ध वर्ण आणि स्वभावसिद्ध कर्म यांचा मेळ बसतोच असें नाहीं" (-मंजरी, पान ८२३) ही जाणीव त्यांना एक प्रकारची टोंचणी देत असल्यानें, आपल्या म्हणण्याला नुसत्या श्रद्धेव्यतिरिक्त बौद्धिक प्रमाणाचा थोडा तरी पाठिंबा असावा असें त्यांना वाटत असावें. म्हणून त्यांनीं लिहिलें आहे कीं, "कुत्रीं, मांजरें, कोंबड्या, घोडीं यांचें उत्पादन करतांना पूर्वींच्या पिढ्या काळजीपूर्वक तपासण्याची पाश्चात्त्यांत वहिवाट आहे. परंतु मनुष्य-जातीच्या जोडप्यांत मात्र त्यांच्याकडून अशी चिकित्सा केली जात नाहीं हें आश्चर्य होय ! आमच्या भरतखंडांतील समाजांत मानवी विवाहांत मागील पिढ्या पाहण्याची वहिवाट आहे." पण हें विधान करतांना त्यांच्या हें लक्षांत आलें नसावें कीं, कुत्रीं, मांजरें, कोंबड्या, घोडीं वगैरेंच्या ज्या पूर्व पिढ्या पाहिल्या जातात त्या शारीरिक (physical) दृष्टीनें, बौद्धिक दृष्टीनें नव्हे. शिवाय पाश्चात्त्य देशांत व इकडेहि वधूवरांची शारीरिक व आरोग्यदृष्ट्या तपासणी होणें अवश्य आहे हें मत आतां मान्य होत चाललें आहे. वधूवरांच्या पूर्वजांत व निकटच्या नातेवाइकांत कोणाला कसले रोग होते हाहि त्या तपासणीचा एक भाग असतो. परंतु इकडील—विशेषतः जुन्या मताच्या लोकांना अशी तपासणी कितपत मानवेल याचीच शंका आहे. त्या वेळीं उलट ते असा युक्तिवाद करतील कीं, अशी तपासणी करण्यास वधूवर हे काय शर्यतींतल्या जनावरांसारखीं घोडीं, कुत्रीं, कोंबडीं आहेत ! तसेंच पूर्वीं आपल्याकडे मागील पिढ्या पाहत असत याचा अर्थ एवढाच कीं, गोत्र, प्रवर वगैरे जुळतातना व दुसऱ्या जातीचा अगर पोटजातीचा कोठेंहि पदर लागलेला नाहींना, याबाबत ते खात्री करून घेत, एवढेंच. कुलशीलांपैकीं कुल पाहण्याचा सामान्यतः व मुख्यतः हाच अर्थ होय. शील अथवा गुण हे श्री. करंदीकरांच्या सिद्धान्ताप्रमाणें वर्णानुरूप माणसांत असावयाचेच; मग प्रत्यक्ष स्थिति कशी का असेना !

## अंतर्गत प्रमाणें काय दर्शवितात ?

पण गीतेंतल्या चातुर्वर्ण्याची योजना गुणकर्माधिष्ठित होती का जन्माधिष्ठित होती हें इतर कोणत्याहि प्रमाणांनीं ठरविण्यापेक्षां अंतर्गत प्रमाणांनीं ठरविणें अधिक युक्त होईल. गीतेला स्वतंत्र ग्रंथाचें स्थान मिळण्याइतकी तिची योग्यता असली, तरी ती महाभारताचा एक अविभाज्य भाग आहे हें विसरून चालणार नाहीं. म्हणून महाभारतांत अन्यत्र काय म्हटलें आहे हें पाहणें व त्यावरून हा मुद्दा ठरविणें योग्य होय. जी गोष्ट पुनः पुन्हां ग्रंथांत सांगितली असेल तिला 'अभ्यास' असें मीमांसाशास्त्रांत नांव आहे व हा 'अभ्यास' किंवा 'पुनरुक्ति' हें तात्पर्य काढण्याचें मोठें साधन मानलें जातें. गीतेचा कर्मयोगपर अर्थ निश्चित करतांना लोकमान्यांनीं या साधनाचा उपयोग केला होता. या दृष्टीनें महाभारताचें परिशीलन केलें तर व्यक्तीच्या गुणांवरूनच त्याचा वर्ण ठरविला पाहिजे अशा सर्वसाधारण अर्थाचीं वचनें महाभारतांत ठिकठिकाणीं आढळतील. स्थलाभावीं तीं येथें देणें शक्य नाहीं. तथापि, तीं जिज्ञासूंनीं पाहिल्यास त्यावरून गीतेचा अभिप्राय कळून येईल. परंतु याशिवाय या प्रश्नांचीं प्रत्यक्ष व स्पष्ट उत्तरेंहि दिल्याचे दाखले महाभारतांतच आहेत. या दृष्टीनें वनपर्वांतील 'आजगरपर्वां'त नहुष-युधिष्ठिर-संवाद आहे तो पाहिल्यास त्यांत या प्रश्नाचें असंदिग्ध उत्तर सांपडेल. यक्ष-युधिष्ठिर-प्रश्नोत्तरांप्रमाणेंच हाहि एक अत्यंत महत्त्वाचा संवाद आहे. त्यांतील जरूरीपुरता भाग येथें देतों.

सर्परूपी नहुषानें युधिष्ठिराला प्रश्न केला कीं, "ब्राह्मणः को भवेद्राजन् ?". ('हे राजा युधिष्ठिरा, ब्राह्मण कोणाला म्हणावें ?'). त्याला युधिष्ठिरानें उत्तर दिलें कीं,

> "सत्यं दानं क्षमा शीलमानृशंस्यं तपो घृणा ।
> दृश्यन्ते यत्र नागेन्द्र स ब्राह्मण इति स्मृतः ॥"
>
> —(वनपर्व अ. १८२, श्लो. २१)

(सत्य, दान, क्षमा, शील, अक्रौर्य, तप, दया हे गुण ज्याच्या ठिकाणीं दिसतील तोच ब्राह्मण असें म्हटलें आहे).

तसेंच 'शांतिपर्वां'त, मनुष्याच्या अंगीं कोणते गुण असले म्हणजे तो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य








वा शूद्र होतो तें भृगु ऋषींनीं भारद्वाजाला सांगून, ते विशिष्ट गुण अंगीं नसले तर " न वै शूद्रो भवेच्छूद्रो ब्राह्मणो न च ब्राह्मणः।" असा शेवटीं अध्याय १८८ मध्यें समारोप केला आहे. त्यावर नीलकण्ठानें आपल्या टीकेंत, " धर्म एव वर्णविभागे कारणं न जातिरित्यर्थः" ( धर्मच म्हणजे गुणच वर्णभेदाचें कारण आहेत, जन्म हें कारण नाहीं ), असा या वचनाचा अर्थ आहे असें स्पष्टीकरण केलें आहे. या सर्व वचनांवरून, वर्णांवरून गुण किंवा गुणांवरून वर्ण, यांपैकीं कोणतें मत त्या काळीं प्रचलित होतें याची शंकाच उरत नाहीं. तथापि यावर तो सर्प म्हणाला :

" यदि ते वृत्ततो राजन्ब्राह्मणः प्रसमीक्षितः।
वृथा जातिस्तदायुष्मन्कृतिर्यावन्न विद्यते ॥"

( ' हे राजा, जर तुझ्या मतें वर्तणुकीवरून ब्राह्मण कोण हें ठरवावयाचें तर मग जेथवर कृति नाहीं तेथवर, हे आयुष्मन्, जातीवर–जन्मावर आधारलेला वर्ण व्यर्थ होय असेंच नाहीं का ? ' )

अर्थात् हा उत्तरगर्भ प्रश्न आहे, तेव्हां त्याचें उत्तर काय हें सांगणें नकोच. या संवादावरून गीतेच्या १८ व्या अध्यायांत श्लोक ४१ ते ४४ यांत सांगितलेले गुण हे वर्णांचे म्हणून सांगितलेले कोणाला वाटलें, तरी त्यांचा वास्तविक अर्थ काय हें स्पष्ट आहे. आतां महाभारत हा प्रचंड असल्यानें त्यांत क्वचित् परस्परविरोधी वचनेंहि सांपडणार नाहींत असें नाहीं. परंतु साकल्यानें विचार करतां आमच्या म्हणण्याप्रमाणेंच स्थिति आढळेल असा भरंवसा वाटतो.

### वर्ण प्रवृत्तिसिद्ध मानणारे आधुनिक पंडित

कै. लेलेशास्त्री व श्री. करंदीकर हे दोघे महाविद्वान् गृहस्थ ' वर्ण जन्मसिद्ध असतात ' असें मत धारण करणाऱ्यांचे प्रतिनिधी असल्यानें त्यांच्या मताचा आम्हीं वर सविस्तर परामर्श घेतला. परंतु यावरून अलीकडच्या पंडितांत वर्ण हे गुणकर्मसिद्ध अगर प्रवृत्तिसिद्ध आहेत अशा मताचे कोणी नाहींतच कीं काय असें वाटण्याचा संभव आहे. म्हणून त्यांचींहि थोडीं नांवें देतों. कै. मिसेस् ॲनी बेझंट, कै. प्रा. भानु, कै. सदाशिवशास्त्री भिडे व स्वातंत्र्यवीर श्री. सावरकर हीं तीं नांवें होत. मिसेस् ॲनी बेझंट यांनीं आपल्या ' The Passing of the Caste-System ' या व्याख्यानांत " Can you pretend that these (castes with conflicting qualities) are the castes spoken of by Shri Krishna as emanating out of Him by qualities and character ? The only thing you can do, in such conditions, if you wish to keep the outline of caste, is to change it back to the old flexible form, and say that whatever the qualities are which the man shows out, they mark this caste. " ( " ज्या ठिकाणीं गुण व वर्ण जुळते नसतात अशा वर्णांची तरफदारी श्रीकृष्णांनीं गीतेंत केली आहे असें तुम्ही म्हणूं शकाल काय ? अशा परिस्थितींत जर जातीचा देखावा तुम्हांला कायम ठेवावयाचा असेल तर तुम्हांला एकच गोष्ट केली पाहिजे. ती ही कीं, वर्णाच्या ' जुन्या ' लवचिक प्रकाराचा तुम्हीं अंगीकार केला पाहिजे आणि जे कोणतेहि गुण माणसाच्या अंगीं दिसून येतील ती त्याची जात असें म्हणण्यास तयार झालें पाहिजे." ) यावरून मिसेस् ॲनी बेझंट यांचें मत काय होतें हें कळून येतें. श्री. भानु यांनीं ४६ वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलेल्या ' श्रीमद्भगवद्गीता : उपसंहार ' या ग्रंथांत, " भगवंतांस वर्णभेद इष्ट होता, पण हे वर्णभेद गुणभेदावरून मात्र ठरवावेत, असा त्रिकालज्ञ भगवंतांचा निश्चय दिसतो. ", तसेंच, " आपला स्वभाव कसा आहे हें आपणांस, आपल्या मातापितरांस–निदान आपल्या हितैषी गुरूंस–आपल्या बोलण्याचालण्यावरून व विचारांवरून कळतें. तेव्हां आपण कोण व आपला वर्ण कोणता, हें प्रत्येकानें ठरवून घ्यावें आणि मग ज्या वर्णाचे आपण ठरूं, त्या वर्णास विहित असणारीं कर्में करण्यास आपण लागावें " असें लिहून ठेवलें आहे. परंतु या सर्वांहून गीतेचे एकनिष्ठ भक्त, विवेचक अभ्यासू व गीताधर्ममंडळाचे संस्थापक गीतावाचस्पति कै. श्री. सदाशिवशास्त्री भिडे यांचें

बत अधिक महत्त्वाचें आहे. त्यांनीं 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' या श्लोकावर टीका करतांना, " वर्ण हे जन्मसिद्ध नसून गुणकर्मसिद्ध असावेत असें दिसतें " असें म्हणून नहुष-युधिष्ठिरसंवादाचा दाखला दिला आहे. स्वातंत्र्यवीर श्री. सावरकर यांनींहि 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' म्हणजे " मीं चातुर्वर्ण्यसंस्था उत्पन्न केली एवढाच त्यांत अर्थ आहे " असें सांगितलें आहे. " गुणधर्माप्रमाणें ( मी ) लोकांस जन्म देतों आणि तोहि वंशपरंपरा देत राहतों, या अर्थाचा मागमूसहि त्या श्लोकांत नाहीं " असें स्वातंत्र्यवीरांनीं ( 'जात्युच्छेदक निबंध', पान १६ ) म्हटलें आहे तेंहि अत्यंत विचारार्ह आहे.

पण हीं नांवें दिल्यावर साहजिकच कोणीहि विचारील कीं, गीतेवरील टीकेंत ज्यांचें नांव जुन्या व नव्या भाष्यकारांत अग्रस्थानीं गणलें जाईल अशा लोकमान्य टिळकांनीं या प्रश्नाबद्दल कोणतें मत व्यक्त केलें आहे ? प्रश्न अगदीं बरोबर आहे. पण लोकमान्यांनीं इतर टीकाकारांप्रमाणें हा प्रश्न विशेष तपशीलवार रीतीनें अगर प्रामुख्यानें चर्चिलेला नाहीं, हें मान्य करणें भाग आहे. पण याचें एक कारण असें असूं शकेल कीं, या प्रश्नाबद्दल तीव्र मतभेद होण्यास जागा आहे असें त्यांस वाटलें नसावें. परंतु असें असलें तरी त्यांचें मत अगदींच अनुमेय नाहीं असें मात्र नाहीं. १८ व्या अध्यायांतील ४१ ते ४४ या श्लोकांच्या भाषान्तराखालीं जी टीप दिली आहे तींत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, " चातुर्वर्ण्यव्यवस्था स्वभावजन्य गुणभेदानें निर्माण झालेली आहे. " आतां 'स्वभावजन्य' हें विशेषण फक्त व्यक्तींनाच लागूं पडणारें असल्यामुळें व्यक्तीच्या उपजत गुणांवरून त्यांचे वर्ण ठरतात असा या वाक्यानें अभिप्राय व्यक्त झाला आहे असें आम्हांस वाटतें. तसेंच पुढें " ही उपपत्ति गीतेंतच अपूर्व आहे असें नाहीं " असें लिहून लोकमान्यांनीं महाभारतांतील नहुषयुधिष्ठिरसंवादाचा व इतर दोन-तीन प्रसंगांचा उल्लेख केला आहे. वरील अधोरेखित वाक्यांवरून व नहुष-युधिष्ठिरसंवादांत काय सांगितलें आहे यावरून लोकमान्यांचें मत वर्ण गुणकर्मसिद्ध आहेत असेंच असावें, असें वाटल्याशिवाय राहात नाहीं.

वरील एकाच मुद्द्याचें इतकें विस्तृत विवरण करण्याचें कारण इतकेंच कीं, गीता हा सर्वमान्य धर्मग्रंथ असल्यानें व त्यांत चातुर्वर्ण्याचें समर्थन केलें असल्यानें तें न मानणें म्हणजे अधर्म होईल अशी पुष्कळांची समजूत असते. यामुळें गीतेंत जें चातुर्वर्ण्य प्रतिपादिलें आहे त्याचें खरें स्वरूप तरी कोणतें तें प्रथम निश्चित होणें अवश्य होय. म्हणून मुख्यतः या दृष्टीनें हा लेख लिहिला आहे. शिवाय मागील लेखांत आम्हीं म्हटल्याप्रमाणें 'जन्माच्या अधिष्ठानाखालींच वर्ण व जाती यांची विषारी नांगी लपलेली आहे.' म्हणून तें विष नाहींसें करून टाकण्याचा एक महान् प्रयत्न वेद-व-उपनिषत्कालानंतर गीतेंत पुन्हां करण्यांत आला. तो यशस्वी होऊं शकला असता तर गुणांना प्राधान्य मिळून सर्वांना आपापल्या गुणानुरूप तेज दाखविण्याची समान संधि मिळाली असती व मग वर्ण व जाती यांमुळें झालेल्या उच्चनीचपणाच्या भावनेला व दुहीला कांहीं तरी आळा पडला असता. परंतु जन्माचा आधार हा व्यवहारास सुलभ व वरच्या वर्गाचें कायमचें वर्चस्व वाढविणारा असल्यामुळें श्रीकृष्णाचा प्रयत्नदेखील विफल झाला हें मागील लेखांत आम्हीं दर्शविलेंच आहे. गुणकर्मांच्या पायावर चतुर्वर्ण समाजाची रचना आहे अशा अर्थाचीं गीतेंतील सर्व वचनें उपचार, उपदेश व सदिच्छा या स्वरूपाचीं ठरलीं आणि 'तत्त्व मान्य, पण तपशील अमान्य' असा प्रकार व्यवहारांत सुरू होऊन 'ये रे माझ्या मागल्या' अशीच स्थिति झाली. अर्थात् गुणकर्मांवर आधारलेल्या चातुर्वर्ण्याचा, किंबहुना कोणत्याहि वर्णव्यवस्थेचा अगर जातिव्यवस्थेचा, पुरस्कार करणें एकंदरींत इष्ट आहे का, त्यामुळें मागें कांहीं हित झालें आहे का व पुढें होण्याची आशा आहे का, या व अशा अधिक व्यापक प्रश्नांचा विचार क्रमप्राप्तच ठरतो. पण तूर्त येथेंच थांबणें बरें.

---








श्री. कर्तारसिंह दुग्गल : अनुवादक–श्री. वि. ग. जोशी

# तीस जानेवारी एकोणीसशें अठ्ठेचाळीस !

हें हॉटेल कॅनॉट प्लेसवर आहे. दिल्लींतील कदाचित् हें सर्वांत मोठें हॉटेल असावें. तो आणि त्याची मैत्रीण सकाळपासून चिंतातुर होतीं. " येथें जागा कोठें मिळणार ? " तिनें वेड्यासारखें विचारलें. " पाहतों काय होतें तें " त्यानें तुटकपणानें उत्तर दिलें आणि तीं दोघें वर जाऊं लागलीं.

एक नाहीं, दोन खोल्या त्या ठिकाणीं मोकळ्या होत्या. ते चकित झाले. त्याच्या मैत्रिणीनें आनंदानें हळूच त्याला चिमटा घेतला. त्यानें वळून पाहिलें. मागें आणखी ग्राहक उभे होते. दोन काळसर पुरुष ! दुसरी खोली त्यांनीं घेतली.

जेव्हां गडी त्यांना घेऊन वर चालला होता तेव्हां तरुणीनें वळून पाहत आपल्यामागून येणाऱ्या ग्राहकांवर दृष्टि टाकली.

" काळासारखा पाठलाग करीत आहेत ! " तरुण म्हणाला. तो कवि होता.

" दोघे पंडुरोगी आहेत बहुतेक, " तरुणीनें आपला अंदाज केला. ती डॉक्टरीची परीक्षा देणार होती.

आणि नंतर हे आपल्या खोलींत आणि ते आपल्या खोलींत गेले. तेरा नंबर आणि चौदा नंबर !

खोलींत प्रवेश करतां करतां तरुणानें आपल्या शेजाऱ्यावर दृष्टि टाकली. " एक आंधळा आहे, दुसरा काणा, " त्याच्या अन्तरांत लपून बसलेला माणूस म्हणाला.

" एकाला जरा जास्त ताप आहे. दुसऱ्याला जरा कमी. दोघेहि आजारीच आहेत, " तरुणीच्या अंतरांत लपलेल्या स्त्रीनें अंदाज केला.

आणि आपआपल्या खोल्यांत गालिच्यांवर, गाद्यांवर, सोफ्यांवर ते यांना विसरून गेले आणि हे त्यांना.

" तुम्ही स्नान करा प्रथम, तोंपर्यंत जेवायची वेळ होईलच. " तरुणी म्हणाली आणि मग सूटकेस उघडून आंतील वस्तू बाहेर काढून ठेवावयास लागली. तरुण जोंपर्यंत स्नान करीत होता तोंपर्यंत तरुणी कांहीं ना कांहीं तरी करीतच होती. नंतर तिनें एक पुस्तक उचललें : ' बंधुभगिनींनो !'. हीं गांधीजींनीं प्रार्थनासभेंत दिलेलीं भाषणें होतीं. तरुणीला गांधीजींविषयीं फार प्रेम वाटत होतें. " मुसलमान माझा भाऊ आहे " तिच्या कानांत गांधीजींचे हे शब्द गुंजारव करीत. ते किती प्रेमळपणानें, किती अंतःकरणपूर्वक, किती खरेपणानें, किती सरळपणानें बोलत ! उमतुल रसुल आणि सुशीला नायर–दोघीं जणूं बहिणी होत्या आणि मोहनदास करमचंद गांधी त्यांचे वडील होते ! कॅनॉट प्लेसवर जेव्हां आग लागलेली होती, दुकानें लुटलीं जात होतीं, भोसकाभोसकी चालू झाली होती, गोळ्या सुटत होत्या, तेव्हां हॉटेलचे

---

ही गोष्ट मूळ हिंदींत ' सरगम ' मासिकाच्या मे १९५० च्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे. तिचा हा मराठी अनुवाद प्रकाशित करण्यास लेखक श्री. कर्तारसिंह दुग्गल आणि ' सरगम 'चे संपादक श्री. ख्वाजा अहमद अब्बास यांनीं परवानगी दिली त्याबद्दल त्यांचे आभारी आहोंत.—का. सं.

# तीस जानेवारी एकोणीसशें अठ्ठेचाळीस !

सर्व मुसलमान नोकर पळून गेले होते. हिंदु, शीख मुली टोळकीं बनवून आरडाओरड करीत होत्या हें तिला आठवलें. संध्याकाळीं जेव्हां रेडिओवर प्रार्थनासभेंतील रेकॉर्ड वाजविण्यांत येई तेव्हां खोलींत बसली असतांनाच, बापू या क्षणींच आपल्याला निकट बोलावीत आहेत, असें तिला कधीं कधीं वाटावयाचें !

सूटकेसमध्यें गांधीजींवर आणखी किती पुस्तकें पडलेलीं होतीं— उर्दूंत, हिंदींत, इंग्रजींत.

पुस्तकांची उलटापालट करीत असतांनाच तरुणी एकदम दचकली. जशी एखादी वस्तु खालीं पडावी तसा एकदम शेजारच्या खोलींतून 'खडाक' असा आवाज आला ! तेरा नंबरच्या खोलींत कमी तापाचा माणूस लवंडला होता, जास्त तापाचा बेचैन झाला होता. इतकें मोठें काम अजून पार पडायचें होतें ! आणि ताप तर थांबायचीं चिन्हें दिसत नव्हतीं. त्याला प्रत्येक वस्तु पिवळी पिवळी असल्यासारखी दिसत होती. त्यानें परटानें धुतलेलें पांढरें धोतर काढलें आणि पलंगावर पडलेल्या आपल्या दोस्ताला विचारलें, "कोणता रंग असेल याचा ?" "पिवळा" त्यानें उत्तर दिलें.

"त्या सर्वांना पांढरे करुन टाकूं—" आणि नंतर दोघेहि गाऊं लागले ! कमी तापाचा हलक्या आवाजांत आणि जास्त तापाचा अकडींत, ऐटींत !

"हे शेजारच्या खोलींतले पंढरोगी काय खडबड करताहेत कोण जाणे !" स्नान करून बाहेर पडत असलेल्या तरुणास तरुणी म्हणाली. "कधीं ट्रंका उघडण्याचा आवाज येतो, तर कधीं बंद होण्याचा. कधीं कांहीं तरी पडतें, तर कधीं कांहीं फुटतें— !"

"डोकें बिघडलेले असतील," तरुणानें कपडे घालतां घालतां म्हटलें.

जेवणाच्या खोलींतहि तेरा नंबरचें टेबल चौदा नंबरच्या जवळ होतें. रीतीप्रमाणें चौदा नंबरच्या नंतर आलेल्या जोडीनें आपल्या शेजाऱ्यांकडे पाहून स्मितहास्य केलें आणि ते बसले. एकानें पांढरें धोतर नेसलें होतें आणि दुसऱ्यानें खाकी विजार आणि शर्ट घातला होता. त्यांच्यांत एक जरा जास्त काळा होता. दुसरा कमी. दोघेहि मचा-मचा खात होते ! खिडकीच्या कांचेला कापीत एक चमकता किरण खाकी विजारवाल्या माणसावर पडला होता.

तरुण युवक आणि युवती गप्पागोष्टी करीत होतीं.

"आज दुपारीं—" त्यांनीं विचार केला. "बाहेर जायचें नाहीं." त्यांना एक मोठा निर्णय घ्यावयाचा होता.

"आणि बिर्लामंदिर ?" तरुणीनें सायंकाळच्या कार्यक्रमाविषयीं विचारलें.

"आज नको, उद्यां जाऊं या," तरुणानें घोटाळत उत्तर दिलें. तरुणाची प्रतीक्षा करतां करतां तरुणी कित्येक दिवस बापूंच्या प्रार्थनासभेला गेली नव्हती.

"हो, मी गेल्या वेळीं गेलें होतें त्या वेळीं बापूंनीं उपवास संपविला होता. आज कोणती तारीख बरं ?" तरुणीनें तरुणाला विचारलें आणि तरुण सांगणार इतक्यांत शेजारच्या टेबलावरून आवाज आला—"आज तीस तारीख आहे. जानेवारीची तीस तारीख. एकोणीसशें अठ्ठेचाळीस, तीस जानेवारी एकोणिसशें अठ्ठेचाळीस".—तरुण युवक आणि युवती बेचैन झालीं होतीं. अशा तऱ्हेचे गुंड या हॉटेलांत उतरतात ! तरुणीनें तरुणाकडे पाहिलें ! जसें कांहीं तिचे डोळे सांगत होते "मला तर हे डाकूच वाटतात !" आणि लवकर लवकर जेवण संपवून ते आपल्या खोलींत आले.

खोलींत ते वर्तमानपत्र पाहूं लागले. वर्तमानपत्र वाचीत नसते तर ते विचार करीत बसले असते. आपल्या अडचणींना त्यांनीं मार्ग शोधला असता. आणि त्यांची अडचण कांहीं साधीसुधी नव्हती ! "आजकाल सुऱ्हावर्दीहि येत असतात," तरुणानें वर्तमानपत्र वाचतां वाचतां मोठ्या आवाजांत म्हटलें.

"हो, कित्येक दिवस झाले, ते प्रार्थनासभेंत बापूंबरोबरच बसतात." तरुणीला रोजचा कार्यक्रम माहीत होता.

"अरेरे ! महात्माजी जरा पूर्वी जन्मावयास हवे होते !"

"हो ! मग आतांपर्यंत हिंदु-मुस्लीम झगडा मिटला असता !"

"आणि मग--आणि मग--" दोघेजण एकदमच म्हणाले.

तीं दोघं--एक तरुण मुसलमान युवती आणि एक तरुण शीख युवक--एकमेकांवर जसें कांहीं पुरातन कालापासून प्रेम करीत होतीं. तरुणी म्हणायची--"तुला प्रत्यक्ष पाहण्यापूर्वी--फार पूर्वी--तूं माझ्या स्वप्नांत वास्तव्य करीत होतास ! मी तुझ्याविषयीं ऐकलं म्हणजे माझ्या हृदयांत कसंसच व्हायचं. आणि नंतर मीं तुला पाहिलं. जशी नदी समुद्राकडे येते, तसं मलाहि वाटायचं, एक लाट बनून तुझ्या अंतरांत मिसळून जावं !"

पलीकडे पाकिस्तानांत तिचें सर्व कांहीं लुटलें गेलें होतें. तिच्या स्वप्नांचा मृत्यु ! ज्यांनीं आपल्या रक्तानें तिचें पालनपोषण केलें होतें त्या नातेवाईकांचा मृत्यु ! जे एकमेकांकरितां पूर्वी त्रास सहन करावयास तयार होते, ते आतां भाऊ भाऊ राहिले नव्हते, मित्र उरले नव्हते. त्या नाजुक कळ्या--ज्यांवर आपल्या आंसवाचें पाणी तिनें शिंपलें होतें--त्या तिला ओळख देण्यास तयार नव्हत्या !

शेजारच्या खोलींत पडलेला तो माणूस विचार करीत होता. त्याचा ताप आणखी जास्त वाढला होता. कमी तापवाल्याचा ताप आतां कमी होत होता. तो आरशासमोर उभा राहून काजळ घालीत होता. "अरेरे ! जर का स्त्री असतों !" तो विचार करायचा "मी स्त्री असतों, मी स्त्री असतों तर !"

जास्त तापवाल्याचा ताप आणखीच चढत होता. त्यानें कमी तापवाल्याला सांगितलें कीं, "मला ती 'वस्तु' पकडूं दे. एक तर एक." तो तर त्या वस्तूमुळें आकाशांतले तारे तोडूं शकत होता, आकाशाला खालीं पाडूं शकत होता ! आणि मग ही जमीन त्याची होईल, नंतर नवीन चंद्र उगवेल, मग नद्या थांबतील. नंतर हवा झुलावयास लागेल ! हा पिवळा रंग--कोणतीहि वस्तु लाल राहणार नाहीं ! कोणतीहि वस्तु काळी राहणार नाहीं. पिवळया रंगाचा त्याला तिटकारा होता. चारी बाजूंना पिवळा रंग होता. त्यानें खोलीच्या भिंतीकडे पाहिलें. भिंत पिवळी होती. त्याच्या मनांत आलें, "आपल्या हातानेंच त्या 'वस्तू'ला फिरवून आपल्या छातीवर ठेवावें आणि मग घोडा दाबावा. आपोआपच वस्तू लाल होतील, काळ्या होतील, पांढऱ्या होतील." आणि नंतर त्या वस्तूची नळी जशी कांहीं खालच्या बाजूस वळून खालीं पडली !

कमी तापवाल्यानें येऊन जास्त तापवाल्याला गदगदां हलविलें--"असं या 'वस्तू'ला खालीं पाहून चालणार नाहीं."

चौदा नंबरमधील तरुण युवक आणि तरुण युवती पुन्हां दचकलीं. तेरा नंबरमधील आहेत तरी कसलीं माणसें ? पुन्हां 'खडाक' ! त्यांना आपल्या कठिण प्रश्नाचें उत्तर शोधावयाचें होतें. अरेरे ! निदान आज सायंकाळपर्यंत तरी का होईना, ते ही खडबड बंद ठेवतील का !

एक शिकलीसवरलेली मुसलमान युवती, एक शिकलासवरलेला शीख युवक ! त्यांना एकमेकांवर प्रेम करण्याचा काय हक्क होता ? गुरु नानकाचा काळ निराळा होता. त्या वेळीं त्याच्या एका बाजूला स्त्रिया बसत होत्या आणि दुसऱ्या बाजूला पुरुष. आज शीख मुसलमानापासून बरेच दूर गेले आहेत. जे पूर्वी दोघे देवासमोर एक होते त्यांना आज असं झालं तरी काय ? किती वाईट तऱ्हेनें शीखांनीं मुसलमानांची कत्तल केली ! फक्त एवढ्याचकरितां कीं ते मुसलमान होते ! आणि मुसलमानांनीं शीखांच्या केसांना पकडून पकडून, फराफरा ओढूनओढून मारलें होतें ! शीखांचीं शहरेंच्या शहरें, गांवेंच्या गांवें नष्ट-उद्ध्वस्त करण्यांत आलीं होतीं. आणि ह्या जखमा अजून ताज्या होत्या. ज्या तलवारींनीं रक्तांत स्नान केलें होतें त्यांचें अजून रक्तहि निथळलें नव्हतें ! जे सुरे आपल्या शेजाऱ्यांच्या छातींत घुसले होते ते अजून साफहि झाले नव्हते ! अशा परिस्थितींत एक शीख तरुण आणि एक मुसलमान तरुणी आतां ज्या प्रकारचा विचार करीत होते तसला विचार शक्य कोटींतील होता का ? नाहीं ! नाहीं ! ! नाहीं ! ! !--घड्याळांत ३ वाजत होते आणि तरुण आपल्या आसवांनीं भरलेल्या नेत्रांनीं तरुणीकडे पाहात होता आणि तरुणी आपल्या आसवांनीं भरलेल्या नेत्रांनीं तरुणाकडे पाहात होती.








# तीस जानेवारी एकोणीसशें अठ्ठेचाळीस !

एका मिनिटानंतर शेजारच्या खोलीतून घड्याळाचा आवाज आला. " आज–आज–आज–" त्या खोलीनें आपले तीन वाजविले.— " आज, नाहीं तर कधींच नाहीं ! " समोर कमी तापवाला पडलेला होता, त्याचा ताप वाढायचा संभव नव्हता. तो तसबिरीकडे पाहत होता; पुस्तकें वाचीत होता. पलंगावर आपल्या मित्राजवळ तो बसला होता. " म्याड ! " जास्त तापवाल्यानें मनांतल्या मनांत तिटकाऱ्यानें म्हटलें. आणि नंतर तो जास्त तापवाला विचार करूं लागला : " समजा, ही तसबीर तुटून पडली तर ! हा वारा कां सारखा दरवाजाशीं खडखडत आहे ? " ( आंत स्नानगृहांत नळाचें पाणी टप-टप पडत होतें. ) " हा आवाज कोणी बंद करूं शकत नाहीं का ? आज वादळ तर होणार नाहीं ? पाऊस तर पडणार नाहीं ? त्या मोटारीहि कधीं कधीं 'फेल' होतात. परंतु दुसऱ्या मिळूं शकतील !— वाटेल त्यानें जगाला विकत घ्यावं ! कोणाला वाटलें तर त्यानें सर्व जग तोडून फोडून टाकावें, मुरगळून चिरडून टाकावें ! ॲटम बॉंब घराघरांत असला पाहिजे, एकाएका माणसाच्या ताब्यांत ! "

" तुझा ताप आतां तुझ्या डोळ्यापर्यंत चढूं लागलाय्, " कमी तापवाल्यानें जास्त तापवाल्याला पाहतां पाहतां म्हटलें आणि जास्त तापवाल्यानें रागांत येऊन शेजारची एक वस्तु उचलली आणि कमी तापवाल्यावर फेंकून मारली.

" खडाक ! " पुन्हां आवाज आला. डोळ्यांत आसवें भरलेली तरुणी दचकली. डोळ्यांत आसवें भरलेला तरुण चमकला.–" हे लोक कांहीं निर्णय करूं देणार नाहींत. आज नाहीं तर मग कधींच नाहीं. "–तरुण उद्यां परत जाणार होता.–' जर आज निर्णय झाला नाहीं तर मग परीक्षेनंतर ती कोठें जाणार ? दूर–कोठें तरी दूर–जेथून कधीं परत येतां येणार नाहीं असा अनोळखी देश. ' ती तरुणी विचारमग्न होती आणि हा देवदूत जो खुदानें पाठविला होता, तो खुदाकडे परत जाईल. हा देश–जेथें तिचा जन्म झाला, पोषण झालें आणि वाढ झाली–आतां तो देश परका होणार होता ! तो एक तरुण शीख आणि ती एक तरुण मुसलमान युवती–त्यांनीं जें रोपटें पांच वर्षांपूर्वीं आपल्या प्रेमाचें चिन्ह म्हणून लावलें होतें तें आज फळांच्या भारानें वांकलें होतें. तरुणीला आठवलें कीं, आज पांच वर्षांपूर्वीं तिनें त्याला प्रथम पाहिलें होतें. आज त्यांना शेवटचा निर्णय करायचा होता. " करणें तर जरूर आहे, " एकदमच दोघें म्हणालीं. परंतु 'कशाप्रकारें केलें पाहिजे' या गोष्टीचा निर्णय करणें प्राप्त होतें.

'कश्या प्रकारें केलें पाहिजे ?' या गोष्टीचा निर्णयहि तेरा नंबरमधील तो माणूस करून आला होता. त्याचा ताप सारखा वाढतच चालला होता. त्याच्या वाढत्या तापाबरोबर त्याच्यासमोर कांहीं चित्रें तरळूं लागलीं. एक धर्म, एक वर्ण, एक देश ! आणि तो राहून राहून स्मितहास्य करीत होता–कधीं उंच उंच आवाजांत हंसत होता ! मग त्यानें कमी तापवाल्याला आपल्या पलंगाजवळ बोलावलें. त्याचे डोळे एका वस्तूवर रोंखलेले होते ! त्यानें एक गोष्ट सांगावयास सुरुवात केली : " एक होता राजा. एके दिवशीं त्याच्या मनांत विचार आला कीं आज न्याय करावा. म्हणून न्यायसभा जमली. पहिला दावा सुरू झाला. हा एका मुलाविषयीं दावा होता. त्याच्या दोन माता दावेदार होत्या. एक म्हणाली ' हा माझा मुलगा आहे.' दुसरी म्हणाली ' हा माझा मुलगा आहे. ' राजा हैराण झाला. शेवटीं तो म्हणाला ' आम्ही या मुलाची वांटणी करतों. ' त्यानें आपली तलवार मुलाचे दोन तुकडे करावेत म्हणून परजली. खरी आई तळमळून म्हणाली, ' खरंच सगळें मूल तिलाच द्या. हा मुलगा तिचा आहे, माझा नाहीं. '–परंतु खोट्या आईनें म्हटलें, ' नको, मला अर्धाच पाहिजे.' आणि न्यायप्रिय राजाची तलवार उचलली गेली आणि मुलाचे दोन तुकडे करण्यांत आले. " आणि जास्त तापवाला जोरजोरानें हंसूं लागला. किती जोरांत हंसत होता तो !

" हा तेरा नंबरवाल्यांना सभ्यतेचे नियमहि माहीत नाहींत वाटतं ? " तरुणीनें चिडून तरुणाकडे पाहत म्हटलें.

" जग असभ्य लोकांनीं भरलेलें आहे. हे तर नुसते हंसत आहेत ! नाहीं तर यांच्यासारख्या माणसांनीं याच्यापेक्षांहि भयानक गोष्टी केल्या असत्या ! " तरुणाच्या डोळ्यांनीं उत्तर दिलें.








" पण यांचं हंसणं ऐकलं म्हणजे वाटतं कीं, जसं कांहीं गोळीबार होत आहे, बॉम्ब फुटत आहेत ! " तरुणीनें नजर भिडवून म्हटलें.

आणि तरुणीचें हृदय धडधडूं लागलें. पूर्वी एकदां तिचें हृदय अगदीं असेंच धडधडलें होतें. त्या वेळीं रात्रभर कॅनॉट प्लेसवर आगी लागल्या होत्या, लूटमार होत होती, गोळीबार होत होता. आणि नंतर बातमी आली कीं, दंगेखोर तिच्या कॉलेज-वरहि हल्ला करणार आहेत, हिंदू सगळया मुसल-मानांना मारून टाकणार आहेत ! आतां तिच्या मनांत विचार आला कीं शेजारच्या खोलींतले हिंदूच असावेत ! नंतर तिला आपलीच लाज वाटूं लागली. ती विचार करूं लागली, " जोंपर्यंत गांधी जिवंत आहेत, जोंपर्यंत हिंदुस्थानच्या जहाजाचा हा नावाडी जागेवर आहे– ! उद्यांच तर आपण त्यांच्या प्रार्थनासभेस जाणार–आपणाबरोबर आपला शीख मित्र असणार. त्यानें अजूनपर्यंत बापूंचें दर्शन घेतलें नव्हतें. मी बापूंना सांगेन–'बापू, तुम्ही आमच्या अडचणी दूर करण्याचा मार्ग सांगा.' आणि ते स्मित करतील, हंसतील, आणि त्यांचें कार्य पूर्ण होईल. "

" आज माझें कार्य पुरें होणारच, " जास्त तापवाला बोलत होता आणि कपडेहि चढवीत होता. खाकी निकर, खाकी शर्ट, बदामी बूट. " मला नेहमीं असं वाटत आलें आहे कीं, मीं कांहीं तरी करण्याकरितां जन्म घेतला आहे ! "—एकदां ताजमहाल पाहिल्यावर त्याचे तुकडे तुकडे करून टाकावेत असं त्याला वाटलें होतें आणि नंतर तो तेथील संगमरवरी शिळेवर बेहोष झाल्यासारखा पडला होता. कोणी म्हणत, याला अपस्मार आहे ! कोणी म्हणत, याला मूर्च्छा आली आहे ! एकदां चतुर्दशीच्या रात्रीं चंद्राच्या चांदण्यांत मोत्यांनीं भरपूर भारावलेल्या आपल्या तरुण पत्नीला पाहून त्याच्या तोंडांतून फेंस बाहेर पडला होता आणि कमेटीच्या बागेच्या पायऱ्यावर तिला त्यानें जोरांत धक्का दिला होता.—आणि " आज–आज–आज–आज–" घड्याळानें ४ वाजविले. तो अगदीं तयार होता. खालीं मोटारीच्या हॉर्नचा आवाज आला. तो अगदीं तयार होता. त्यानें कमी ताप-वाल्याकडे पाहिलें. तो पुन्हां एकदां आरशासमोर उभा राहून डोळ्यांत काजळ घालूं लागला. " श्याड ! " जास्त तापवाल्यानें पुन्हा एकदां मनांतल्या मनांत म्हटलें आणि रेडिओचें बटन फिरवून तो बाहेर पडला. कमी तापवाल्यानें आपल्या मित्राला बाहेर पडतांना पाहिलें आणि नंतर गरम होणाऱ्या रेडिओकडे दृष्टि टाकली. त्याच्या हातांतून एकदम सुरम्याची बाटली पडून फुटली.

पुन्हां आवाज आला. इकडे आतां खोलींत तरुण आणि तरुणी चहा पीत होतीं. त्यांनीं निर्णय घेतला होता कीं, आपल्याविषयीं आतां रात्रींच विचार करायचा; त्या वेळीं तेरा नंबरमधून आवाज येणार नाहींत ! दिवसभर जशा कांहीं मधल्या भिंतीमधून आगीच्या लांबच लांब ज्वाळा निघत होत्या आणि त्यांना लपेटून टाकण्याचा प्रयत्न करीत होत्या ! त्या खोलीच्या भिंतींवरून येणारी हवा घाण, कुबट वाटत होती.

आणि तीं दोघें हंसतखेळत त्या तेरा नंबरच्या खोलीला विसरून गेलीं. रात्रीं त्यांना निर्णय करावयाचा होता. मग सायंकाळ उगीच कां फुकट घालवायची ? पण तरीहि तरुणी विचार करीत होती : " काय सांगतां येणार, काय निर्णय लागेल कुणास ठाऊक ! कदाचित् आपली ही एकत्र शेवटचीच रात्र असेल! " आणि तरुण हंसतां हंसतां गप्पागोष्टी करतां करतां एकदम सुन्न झाला होता : " मी अन्याय तर करीत नाहीं ? या तरुणीच्या आईनें कोठें तरी शब्द दिला असेल. तिच्या भावानें कोठें तरी शब्द दिला असेल ! " आणि ही कांहीं इतकी सोपी गोष्ट खासच नव्हती. निर्णय इतका कांहीं सोपा नव्हता. तरुणी मोठ्या घरची होती आणि तरुण प्रसिद्ध शीख घराण्यांतला होता. त्यांचे आई-वडील कसे कबूल करतील ! कठिण ! कठिण !! कठिण !!!

घड्याळानें ६ वाजविले. ती खोली त्यांना जशी कांहीं खायला उठल्यासारखी भासत होती. कां कुणास ठाऊक ? दोघांच्या हृदयांत तगमग वाढत होती. तीं बाहेर आलीं. तरुणीनें विचार केला कीं, आपल्या होस्टेलवर जाऊन सूचना देऊन यावें.

हॉटेलमधून बाहेर पडल्यावर कॅनॉट प्लेसवरली








दुकानें बंद असल्याचें त्यांना दिसलें. त्यांनीं तिकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. सडकेवर मोटारी वेगांत धांवत होत्या. तरीहि त्यांनीं कांहींच विचार केला नाहीं. लोक इकडेतिकडे आजूबाजूला धांवत जात होते. परंतु तीं दोघें आपल्याच विचारांत मग्न होऊन सडकेच्या पलीकडे असलेल्या होस्टेलकडे चाललीं होतीं. तरुणीनें गेटमधून प्रवेश केला न केला तोंच चौकीदार धांवत धांवत आला आणि त्यानें गेट बंद केलें.

तरुण समोरच्या मैदानांत फिरत राहिला. हळूहळू अंधार पडूं लागला होता. पंधरा-वीस मिनिटांनंतर तो पुन्हां गेटवर आला. कठड्याचा आधार घेऊन ती त्याची वाट पाहत होती.

" चल, " तरुणानें नेहमींच्या आवाजांत म्हटलें.

तरुणी गप्प होती.

" कां ? आज गेट इतक्या लवकर कां बंद झालं ? " तरुणानें पुन्हां प्रश्न विचारला, " तूं बोलत कां नाहींस ? तुला झालंय तरी काय ? "

" बापूं...ना...कोणी तरी...मारलं गोळीनं!"

तरुणाची दगडासारखी अवस्था झाली.

" कोणीं तरी तीन गोळ्या झाडून त्यांना मारलं. "—तरुण सुन्न झाला होता.

" मी येऊं शकणार नाहीं. आज इथून कोणालाहि बाहेर पडतां येणार नाहीं. पण तो निर्णय... तो निर्णय मीं घेतला आहे. "

तरीहि तरुण गप्पच होता.

" तुम्हांला 'हो' म्हटलंच पाहिजे.—बापू कधींच मरूं शकणार नाहींत. त्यांना आम्ही जिवंत राखूं."

तरुण तरीहि गप्पच होता.

" या कठड्यांतून तुमचा हात आंत येऊं शकेल. आतां मला जास्ती वेळ वाट पाहायला लावूं नका—" आणि तरुणानें आपला थंडगार हात आंत सरकविला.

" आपण लग्न करायचं—एक शीख आणि एक मुसलमान. " त्यांनीं एकमेकांनीं नजरेनेंच प्रतिज्ञा केली आणि शुद्धीवर नसल्यासारखे; एखाद्या पुतळ्यासारखे ते तेथेंच उभे राहिले. अंधार आणखी वाढला आणि वाढत चालला होता.

दिल्लीच्या सडका कधीं वस्ती नसल्यासारख्या मोकळ्या उजाड पडल्या होत्या ! अगदीं एकटा, मोजून मोजून पावलें टाकीत तो तरुण हॉटेलच्या पायऱ्या चढला. एक शीख तरुण आज मुसलमान तरुणीचा झाला होता. त्याला समजलें होतें कीं, एका हिंदूनें आशियांतल्या सर्वांत उच्च हिंदूचा खून केला होता—आणि तो हिंदू दिवसभर त्याच्या शेजारीं तेरा नंबरच्या खोलींत राहिला होता !

" तरीच म्हटलं, त्या भिंतींमधून दिवसभर आगीच्या ज्वाला कां बाहेर पडत होत्या ! " तरुण विचार करूं लागला.

---

भारतीय संतांचा अध्यात्मवाद, जगांतील अध्यात्मवादाच्या—विशेषतः ख्रिश्चन अध्यत्मविद्येच्या वातावरणांत परिपुष्ट होऊन गांधीमार्गानें व्यवहारांत अवतरला. लो. टिळक व योगी अरविंद घोष यांच्या दिव्य जीवन अनुभवणाऱ्या कर्मयोगी स्थितप्रज्ञाचें जीवन गांधींत प्रतिबिंबित झालें. काळाचें अंतरंग ओळखणारी प्रज्ञा त्यांच्या ठिकाणीं होती. त्यामुळें ते स्वतः भक्त किंवा धार्मिक सन्त असूनहि, राजकारण हें भारताच्या व जगाच्या व्यवहाराचें केन्द्रस्थान झालेलें पाहून त्यांनीं संतांची नेहमींची रीत सोडून राजकारणाचीं सूत्रें ताब्यांत घेतलीं...पारलौकिक क्षेत्रांत नव्हे, तर या भूलोकावर, मृत्युलोकांत माणसाचा पाय कसा स्थिरावेल याचीच चिंता हा साधु वाहत होता. त्याकरितां पाश्चात्त्य संस्कृतीची ग्रीकांपासून चालत आलेली राजकारणांत केन्द्रित झालेली दृष्टि या संतानें अंगीकारली....वर्गभेद, धर्मभेद व राष्ट्रभेद यांच्या क्षुद्र अहंकारांना थारा नसलेलें सर्व मानवांचें विश्वासस्थान म्हणून आश्रमजीवनाची कल्पना म. गांधींनीं काढली. स्वराज्याला नवीं सामर्थ्यें अर्पण करणारीं आत्मशक्तीचीं केन्द्रें देशभर विस्तारून टाकण्याची आकांक्षा या कल्पनेच्या मुळाशीं होती; ही विलक्षण साधना म्हणजे संकटांत सांपडलेल्या जगाला आश्वासन देणारी एक प्रवृत्ति होय.

—तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, 'वैदिक संस्कृतीचा विकास' ( १९५१ )मधून

शोकान्तिके-( Tragedy )संबंधींच्या एका सनातन कूट प्रश्नावर उद्बोधक परिसंवाद

# करुणनाट्यानें आनंद कां व्हावा?

## १. ट्रॅजिडीसंबंधीं एक वेगळा विचार

प्रा. वसन्त कानेटकर व प्रा. राजा पाटणकर

दीपज्योतीवर झेप घेणाऱ्या पतंगाप्रमाणें सर्वनाशाला आमंत्रण देणाऱ्या ट्रॅजिडींतील नायकाविषयीं मानवी मनाला आकर्षण कां वाटावें?—हा साहित्यशास्त्रांतील एक सनातन प्रश्न श्री. दि. के. बेडेकर आणि प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनीं पुन्हां उपस्थित केला असून, त्यांनीं आपआपल्यापरी कांहीं उपपत्ती रसिकांपुढें चिकित्सेसाठीं ठेवलेल्या आहेत. श्री. बेडेकर या आकर्षणाचें बीज समाजजीवनासाठीं उदात्त वेडानें इच्छामरण स्वीकारणाऱ्या नायकाच्या हौतात्म्यामध्यें शोधूं पाहतात. तर प्रा. क्षीरसागर या उपपत्तींतील नायकाच्या सामाजिकतेलाच नव्हे, तर जीवनसाफल्याच्या कल्पनेलाहि कडाडून विरोध करतात. उमदा मानव आणि अंध नियति यांच्या भीषण संग्रामांत, तेजस्वी ध्येयवादापेक्षां अपयश, निष्फळता, दुःख आणि यातना यांचाच रसिक मनावर अधिक परिणाम होतो असें ते प्रतिपादतात. नायकाच्या या सकारण वा अकारण पण अपात्रीं क्लेशांतून कारुण्यापेक्षां भय आणि भव्यता यांचा रसिक मनाला साक्षात्कार होतो असें ते मानतात. आणि त्यामुळेंच ट्रॅजिडींत सौंदर्य आणि रसिकांत सौंदर्यासक्ति निर्माण होते, असें ते सांगतात.

या दोन्ही विचारवंतांच्या उपपत्तींतील विरोध वरकरणीं तरी नायकाच्या सामाजिक आणि व्यक्तिवादी स्वरूपाबद्दल असल्याचा भास होतो. परंतु या दोन्ही उपपत्ती स्वयंपूर्ण वाटत नाहींत. त्यांत सत्याचा अपलाप नसला तरी फक्त अर्धसत्याचेंच दर्शन घडतें. आणि म्हणून सखोल चिकित्सकास त्या अपुऱ्या आणि एकांगी दिसूं लागतात. ट्रॅजिडीसारख्या चिरचर्चित विषयावर अधिकारवाणीनें अखेरचा शब्द ( last word ) सांगणें अशक्य आहे, हें लक्षांत घेऊनहि या परिसंवादांतील चिकित्सेच्या निमित्तानें, एक वेगळा विचार रसिकांच्यापुढें विचारासाठीं नम्रतेनें ठेवण्याचा हा एक प्रयत्न आहे.

'ट्रॅजिडी' ला मराठी पर्याय म्हणून 'शोकान्तिका' हा शब्द जसा त्याज्य आहे, तसाच क्षीरसागरांचा 'भीषण नाट्य' हा, त्यांच्या दृष्टीनेंहि अपुरा असलेला पर्याय, ते सुचवीत असलेल्या त्या मागील वैचारिकतेमुळेंच मान्य करतां येत नाहीं. अंध नियतीच्या प्रचंड चक्रांत उमद्या नायकाचा अकारण वा सकारण पण अपात्रीं चेंदामेंदाच होतो, आणि रसिक मनावर फक्त अपयश, निष्फळता, दुःख आणि यातना यांचाच परिणाम शिल्लक राहतो, हें खरें नाहीं. या गोष्टी ट्रॅजिडीमध्यें सौंदर्य आणि रसिकांत सौंदर्यासक्ति कशी निर्माण करूं शकतील

---

'करुणनाट्यानें आनंद कां व्हावा?' या शोकान्तिके-( Tragedy )संबंधींच्या एका सनातन कूटप्रश्नावरील परिसंवाद 'नवभारता'च्या ऑक्टोबर १९५१ च्या अंकांत दिला होता. त्यांत या प्रश्नासंबंधीं श्री. दि. के. बेडेकर व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनीं आपापल्या भिन्न दृष्टिकोनांतून चर्चा केलेली आहे. या अंकांत त्या चर्चेच्या अनुषंगानें त्याच प्रश्नासंबंधीं प्रा. वसंत कानेटकर व प्रा. राजा पाटणकर आणि कु. चं. श्री. कर्नाटकी यांनीं आपला दृष्टिकोन मांडला आहे—का. सं.







याची प्रक्रिया प्रा. क्षीरसागरांनीं सांगितलेली नाहीं. भीषण नाट्याची त्यांनीं वर्णन केलेली प्रतिक्रिया, रसिकांच्यावर केवळ पराभूतपणाचे आणि हतबलते-चेच परिणाम घडवील. पण प्रत्यक्ष अनुभव आणि वस्तुस्थिति यांविरुद्ध साक्ष देतात. ट्रॅजिडीमुळें रसिक मनांत होणारें अनुकूल संवेदनेचें स्वरूप सवंग आशावादाचें नसलें, तरी उदात्ततेचें आणि भव्यतेचें असतें. नियतीच्या प्रचंड शक्तीपुढें नायकाच्या शक्ती हतबल होतात, हें वर्णन अँटीगनी, लिअर, ऑथेल्लो, अँटनी अँड क्लिओपात्रा इत्यादि नाटकांना लागू पडत नाहीं. या नाटकांतील नायकांचे मृत्यू करुणापेक्षांहि शांतरसाचे द्योतक आहेत. पण त्याविषयीं अधिक मीमांसा पुढें येईलच. महत्त्वाचा मुद्दा हा कीं, ट्रॅजिडींतील नायकाच्या दुःख-यातनांचा आणि रसिक मनावरील उदात्त आणि भव्य परिणामाचा संबंध अधिक स्पष्ट होणें जरूर आहे. या मीमांसेंत केवळ नायकाची व्यक्तिरेखाच डोळ्यांसमोर ठेवून चालणार नाहीं; तर कविमन, दुर्दैवी नायक आणि रसिक यांचे संबंधहि शोधणें जरूर आहे.

### संहार हा शेवटीं सृजनासाठींच

ट्रॅजिडीच्या मीमांसेमध्यें प्रा. क्षीरसागरांनीं ग्रीक ट्रॅजिडीचा उगम ग्रीक धर्मांत आणि डायोनिसिस् या दैवताच्या उत्सवांत झाला असल्याचें नमूद केलें आहे. नीत्शेच्या उपपत्तीप्रमाणें डायोनिसिस् हें दैवत मूलतः संहारक असल्याचें ते सांगतात. पण वस्तुस्थितीमध्यें संहाराप्रमाणेंच सृजकत्व-(creation) चाहि संबंध या दैवताशीं निगडित होता, याचा उल्लेख त्यांनीं केलेला नाहीं. मॅक्निल डिक्सन आपल्या ‘ट्रॅजिडी’वरील ग्रंथांत म्हणतात —“ And Dionysus ? Well, he seems to stand for the hidden fire in nature, the law or principle or rhythm of existence, the ebb and flow, the waxing and waning, the fading and blossoming, the birth and rebirth of all living things...” त्याहीपेक्षां जे. टी. शेफर्ड यांनीं स्वच्छ सांगितलें आहे कीं—“ Dionysus is the spirit of life in all things, in the trees and in the animals as well as in the vine with which, in historical times, he is especially associated...” या दृष्टीनें ग्रीक ट्रॅजिडी संहारकृत्यापेक्षांहि सृजकत्वाच्या विधी-( fertility rite )शीं अधिक संबद्ध आहे, हें मार्मिकांच्या सहज लक्षांत येईल. ट्रॅजिडींतील संघर्ष हा केवळ बऱ्या आणि वाईट ( good and evil ) प्रवृत्तींतील संग्राम नसून, मूलतः ही झुंज सृजकत्व ( creation ) आणि संहारकत्व ( destruction ) या शक्तींमध्यें आहे. निसर्गाप्रमाणेंच मानवाच्या आन्तरजीवनांतहि या शक्तींचें द्वंद्व दृष्टीला पडतें. निसर्गाच्या सृष्टींत संहार आणि सृजन या शक्ती परस्परविरोधी नसून परस्परपूरक आहेत, ही वस्तुस्थिति, विविध ऋतू आणि वनस्पतिजीवन यांचें अन्योन्यसंबंध तपासल्यास, सहज प्रत्ययास येईल. भारतीय पुराणांतील शिव या दैवताचा ज्या संहाराशीं संबंध जोडण्यांत येतो, तो संहार मूलतः सृजनासाठीं आणि सृजनाची पूर्वतयारी म्हणून निर्माण होतो, याविषयीं अनेक पुरावे सांपडतात. (पाहा—विल्किन्स—‘वेदिक मायथॉलजी ’).. सृष्टींत सृजनापूर्वी संहाराची आवश्यकता असते. असा संहार कितीहि क्रूर दिसला तरी तो निर्माणक्षम असतो. नव्या जन्माची आणि नव्या विकासाची त्यांत प्रेरणा आणि बीजें असतात. इजिप्शियन फिनिक्स पक्ष्याची कथा हेंच दर्शविते. ग्रीक ट्रॅजिडी आणि शेक्सपीरिअन ट्रॅजिडी मानवी जीवनांतील अनेक समस्यांचें चित्रण करीत असतांना संहाराचा गदारोळ मांडीत असल्या, तरी आपआपल्यापरी त्या सृजकत्वा-( creation )वर विश्वास प्रकट करतात, ही वस्तुस्थिति आवर्जून लक्षांत घेणें जरूर आहे. निसर्गाच्या नेमकमांत सृजनापूर्वी संहाराची आवश्यकता असेल, तर मानवाच्या आन्तरजीवनांतहि मानवी मूल्यांच्या सृजनासाठीं आणि आत्मिक शक्तींच्या विकासासाठीं, संहारक शक्तींचा गदारोळ निर्माण होणें अपरिहार्य आहे. म्हणून ट्रॅजिडींतील संहारक शक्तींना केवळ भीषण, अकारण, अपात्रीं असलीं विशेषणें लावणें युक्त होणार नाहीं. कारण नायकाच्या वांट्याला असामान्य दुःखें आणि अपरिमित मनोयातना येत








असल्या, तरी त्यांचें स्वरूप प्रसूतिवेदनांचें असतें, यमयातनांचें नव्हे. म्हणून " Tragedy is the vale of tears " ( शेली ) या विधानापेक्षां " Tragedy is the vale of soul-making " ( कीट्स ) ही उक्ति अधिक अर्थदर्शक मानावी लागते.

**नायक दुःखयातना कां स्वीकारतो ?**

ट्रॅजिडींतील नायकाच्या वांट्यालाच हीं दुःखें आणि या यातना कां याव्यात, असा प्रश्न विचारण्यापेक्षां ट्रॅजिडींतील नायक आपलें सुखी जीवन टाकून या दुःखयातनेंत होरपळून जाण्याचें कां पत्करतो, असा प्रश्न निर्माण करणें अधिक फलदायी होईल. कारण हॅम्लेटजागीं दुसरा कोणीहि सामान्य व्यवहारी ( एकाद्या आधुनिक संस्थानिकाचा वारसदार ) राजपुत्र असता, तर तो आपल्या पित्याचा खून आणि आईचें स्मशानघाईनें झालेलें लग्न, या घटनांनीं इतका हादरून गेला नसता ! " You are the most immediate to our throne " असें आश्वासन त्याला त्याच्या चुलत्याकडून मिळालेंच होतें कीं नाहीं ? वडील मंडळींच्या खासगी भानगडींशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं, अशी व्यवहारी शहाणपणाची भूमिका त्यानें स्वीकारली असती तर हॅम्लेट व्यवहारी अर्थानें यशस्वी झाला असता ! तसेंच पाहिलें, तर राजमुकुटावांचून मॅक्बेथच्या घरांतील काय चूल खोळंबली होती ? आपल्या पत्नीचा संशय येतांच तिला ठार मारण्यापेक्षां तिच्याशीं काडीमोड करून पुन्हां लग्नाच्या बाजारांत उभें राहतां येणें ऑथेल्लोला काय अशक्य होतें ? ट्रॅजिडींतील नायकांचीं दुःखें आणि त्यांच्या यातना या केवळ क्रूर आणि अंध नियतीनेंच त्यांच्यावर लादलेल्या असतात हा गैरसमज होय. वरकरणीं सुखापेक्षां या दुःखयातना नायकांनीं आपण होऊन स्वीकारलेल्या असतात. नियतीशीं नव्हे, तर स्वतःशीं या नायकांनीं थोडी तडजोड केली असती तर सर्व व्यावहारिक सुखांचा त्यांच्यावर वर्षाव झाला असता, असें शेक्स्पिअरच्या ' हॅम्लेट-मॅक्बेथ 'पासून तें इब्सेनच्या ' एनिमी ऑफ दी पीपल ' पर्यंत अनेक नाटकांचें सूक्ष्म परीक्षण केलें असतां चटकन् प्रत्ययास येतें. सामान्य मानव आणि ट्रॅजिडींतील नायक यांचे मार्ग याच सीमारेषेवर भिन्न होतात. सामान्य मानव आपल्या जीवनसंग्रामांत प्रत्यहीं अशीच तडजोड करीत राहतो. म्हणून या दुःखयातना त्याला स्पर्श करीत नाहींत. दुःखयातनांचा स्वीकार म्हणजे श्री. बेडेकर म्हणतात त्याप्रमाणें ' भोळेपणा ' नाहीं. भोळेपणांत अज्ञान अभिप्रेत असतें. निष्पाप अज्ञानीपणाहि महत्तेचा प्रत्यय देऊं शकणार नाहीं. दुःखयातनांचा स्वीकार करणाऱ्या नायकाच्या वृत्तीचा वेगळेपणा कशांत आहे आणि तो कोणकोणत्या वस्तुस्थितीवर प्रकाश टाकतो, याची मीमांसा याहिपेक्षां अधिक उद्बोधक आहे.

सामान्यांच्या तुलनेनें ट्रॅजिडींतील नायकाच्या या वेगळेपणाची दखल ॲरिस्टॉटलपासून एफ्. एल्. ल्यूकसपर्यंतच्या सार्‍या महान् टीकाकारांनीं ट्रॅजिडीच्या मीमांसेमध्यें स्थूल मानानें घेतलेली आहे. परंतु या वेगळेपणाचा जन्म नायकाच्या कोणत्या आन्तरशक्तीमधून होतो आणि त्याचे परिणाम नक्की काय काय घडतात याविषयीं फारशी सखोल चिकित्सा झालेली नाहीं. ट्रॅजिडींतील नायक ' महान् ' ( great ) असतो एवढ्या विधानानें त्याच्या वेगळेपणाचा उलगडा स्पष्ट होत नाहीं. हा 'महान्'-पणा जसा त्याच्या कुल-शीलांत आणि लौकिक वैभवांत नाहीं, तसाच तो त्याच्या पराक्रमांत वा अंगभूत सद्गुणांतहि नाहीं, हें सांगणें जरूर आहे. हा वेगळेपणा त्याच्या काव्यात्म वृत्तींत आहे. ट्रॅजिडींतील नायकाची कथा ही वस्तुतः एका ' काव्यात्म्या '-( poetic soul )ची कथा असते. काव्यात्मता म्हणजे स्वप्नाळूपणा नव्हे, तर प्रखर संवेदनक्षमता आणि विशाल समजशक्ति ( intense feeling and profound understanding ) यांची मनोभूमींतील धारणा होय. या शक्ती शारीरिक पराक्रमावर जशा अवलंबून नाहींत, तशाच सांकेतिक सद्गुणांवरहि त्या अधिष्ठित नाहींत. या शक्ती निर्माणक्षम कल्पकते-( creative imagination )मधून जन्म घेतात. ड्यूक ऑफ विंडसरची प्रेमभक्ति, तुकारामाची देवभक्ति आणि गांधीजींची मानवतेची भक्ति बुद्धिवादांतून नव्हे तर विशाल कल्पकतेंतून जन्माला








येते. ही कल्पकता आणि तज्जन्य संवेदनक्षमता आणि समजशक्ति, ट्रॅजिडींतील नायकाला रूढ चाकोरीपेक्षां वेगळ्या मार्गावर नेतात. कारण मानवी समस्यांचे अर्थ त्याला खोलवर उमजतात. आणि त्यांची संवेदनक्षमता त्याला निष्क्रिय बसूं देत नाहीं. हा वेगळा मार्ग दुःखयातनेंतून जातो हें खरें. परंतु या दुःखयातना नायकाला सफल ('अँटनी अँड क्लीओपात्रा') वा असफल ('मॅक्बेथ') अशा आत्मिक शुद्धीकरणाकडे आणि आत्मिक पुनर्जन्माकडे नेल्याखेरीज राहत नाहींत। प्रत्येक महान् ट्रॅजिडींतील नायक, कथेच्या आरंभीं सामान्यांपेक्षां फार वेगळा नसतो. पण कथेच्या ओघांत त्याचा आत्मिक प्रवास सुरू झाला कीं, तो या वृत्तीच्या आणि कृतीच्या वेगळेपणामुळें, सामान्यांना शतयोजनें मागें टाकून पुढें जातो. म्हणून ट्रॅजिडींतील नायकाच्या व्यक्तिरेखेचा विचार करतांना, ही व्यक्तिरेखा थिजलेल्या बर्फाप्रमाणें स्थिर ( flat and static ) नसून गतिमान् आणि विकसनशील ( dynamic & developing ) असतें याचीहि नोंद करून घेणें जरूर आहे.

### विश्वकाल आणि आंतरकाल यांमधील सातत्य

पण हा प्रश्न एवढ्याच मीमांसेनें संपत नाहीं. नायकाचा 'आत्मिक प्रवास' म्हणजे काय ? नायकाची व्यक्तिरेखा गतिमान् आणि विकसनशील असते असें म्हणतांना ही 'गति' अथवा हा 'विकास' कोणता ?—या प्रश्नाची मीमांसा अपरिहार्य ठरते. मानवी जीविताला व्यापून राहणारी गति ( time ) सामान्यतः विश्वकालगणनेनें मोजली जाते. विश्वकाल ( universal time ) म्हणजे पृथ्वीच्या सूर्याभोंवतीं चाललेल्या भ्रमणाचें मानवानें गति मोजण्यासाठीं मान्य केलेलें एक यांत्रिक परिमाण आहे. शरीराचा विकास सामान्यतः विश्वकालगणनेनें मोजला जातो. बाल्य, तारुण्य आणि जरा या अवस्था शारीरिक आहेत, म्हणून त्या विश्वकालांत मोजतां येतात. परंतु या अवस्था नुसत्याच शारीरिक नाहींत. त्या मानसिक आणि आत्मिक प्रगतीच्याहि द्योतक आहेत. फरक इतकाच कीं, शरीराचा विकास निसर्गाच्या प्रेरणेनें आपोआप होतो. उलट मनाचा आणि आत्मिक शक्तींचा विकास मानवाला प्रयत्नानें घडवून आणावा लागतो। सहसा सामान्यांच्या बाबतींत तसें घडत नाहीं. म्हणून शरीरानें वृद्ध म्हणजे 'संपूर्ण' झालेला मनुष्य पुष्कळ वेळां मनानें आणि आत्मिक शक्तीनें अविकसित राहतो. शरीराच्या विकासाच्या दृष्टीनें शेक्स्पिअरचा लिअर आणि प्रॉस्पेरो ( 'टेंपेस्ट' ) या दोन्ही व्यक्तिरेखा 'वृद्ध' म्हणजे संपूर्ण आहेत. परंतु मन आणि आत्मिक शक्ति यांच्या विकासाच्या दृष्टीनें पहिल्या अंकांतील ऐंशीं वर्षांचा लिअर किशोरावस्थेंतच रंगण घालीत पडलेला दिसतो, (— आपल्या मुलींनीं आपल्यावरील प्रेमाचें प्रदर्शन करावें, हा लिअरचा हट्ट 'ॲडोलेसन्स्' अवस्थेलाच शोभण्यासारखा आहे !) तर पश्चात्तापदग्ध कॉलिबन आणि एरिअल या दुष्ट-दुष्ट जीवांना स्वातंत्र्य देऊन आपली शक्ति समुद्रांत टाकून देणारा प्रॉस्पेरो मुक्तावस्थेला पोंचलेला आढळतो. म्हणूनच विश्वकालाबरोबरच व्यक्तीच्या आंतरकालाचा-( inner time )हि उल्लेख, गतीचा विचार करतांना करावा लागतो.

एफ. एल. ल्यूकस यांनीं आपल्या 'Literature and Psychology' ह्या अगदीं नव्या ( प्रकाशन १९५१ ) पुस्तकांतील पहिल्या विभागांत शेक्सपीरिअन ट्रॅजिडीसंबंधीं—विशेषतः हॅम्लेटबद्दल मानसशास्त्राच्या दृष्टिकोनांतून चर्चा केली आहे. आमच्या प्रस्तुत लेखांत जो वेगळा विचार मांडण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे, त्याचा पुरस्कार करणारा दृष्टिकोन ल्यूकस यांनीं या आपल्या ताज्या पुस्तकांत नव्यानें प्रथमच मांडला आहे. हॅम्लेटपुढील समस्या ही मूलतः अविकसित राहिलेल्या ( adolescence ) मनाची समस्या आहे असें त्यांचें मत आहे. हॅम्लेटची मातृभक्ति हें त्याचें गमक आहे. आईवरील प्रेम ही बालकाची नैसर्गिक प्रतिक्रिया असली, तरी प्रेमाची परिणति वेडांत होणें ही विकृति आहे. ज्या वयांत आईच्या भक्तींतून बालकानें मुक्त होणें जरूर आहे त्याच वयांत आईचा पुनर्विवाह हॅम्लेटला पाहावा लागल्यामुळें त्याच्या कोवळ्या निष्ठेचाच चुराडा झाला. पित्याच्या मृत्यूपेक्षां आईच्या स्मशानघाईनें लाग-








लेला विवाह हा हॅम्लेटच्या मनोविकृतीचा गाभा आहे. मुलाचें मातापित्यांवरील परावलंबित्व आणि तज्जन्य आंधळी निष्ठा, ही योग्य कालीं सुटी होणें आणि शरीराप्रमाणेंच मनानेंहि मुलानें आपल्या पायावर उभें राहणें, हें प्रगतीचें आणि निरोगी मनाचें लक्षण आहे. तसें हॅम्लेटच्या बाबतींत घडलें नाहीं म्हणून स्वभावविकृतीच्या अनेक समस्या निर्माण झाल्या. या उपरिनिर्दिष्ट पुस्तकांत (पान ४३) ल्यूकस म्हणतात :

"Therefore the most important gift that education can bring a child is, perhaps, the power to be independent. 'Independent' does not mean cold, hard, loveless or aloof. But all of us have to be born and weaned a second time—to be freed and detached from the body of our childhood's home..."

आत्मिक शक्तींचा अविकास आणि मानवी मनाची खुरटलेली प्रगति याच ट्रॅजिडींतील संघर्षामागें असतात हें सत्य सूचित करतांना ल्यूकस त्याच पुस्तकांत अन्यत्र म्हणतात : "Such tragedies as I have just related arise ultimately from a failure to grow up, to grow out of tha past, to surmount the dependence of childish years and sometimes the shocks suffered in those years...". इब्सेनच्या 'डॉल्स हौस' या जगद्विख्यात नाटकाचें रहस्य विशद करतांनाहि ते म्हणतात :

"Ibsen knew that well enough when he drew his child wife in the 'Doll 's House'; the whole theme of his play is the agony and tragedy of a woman growing up too late."

आंतरकालाचें गतिमत्त्व म्हणजेच, नायकाच्या आत्मिक शक्तींची जागृति (Release of spiritual energies), त्यांचा विकास, त्यांची खुरटेपणांतून मुक्ति व मानसिक पूर्णता (integration). ट्रॅजिडींतील नायकाची व्यक्तिरेखा गतिमान् असते, याचा अर्थ त्याचें नुसतें वयच वाढतें असा नव्हे, तर या समृद्ध अर्थानें जीवनकलहांतील भीषण संग्रामांतून त्याचा खुरटलेला आन्तरकाल गतिमान् होत असतो. त्याचें व्यक्तित्व परिपूर्ण होण्याच्या प्रक्रियेंत असतें. ट्रॅजिडी म्हणजे विश्वकाल आणि आन्तरकाल यांतील सातत्य राखण्याची नायकाची धडपड ! ट्रॅजिडी म्हणजे अपूर्णत्व आणि पूर्णत्व (integration & disintegration) यांतील झुंज ! हार्डीच्या 'मेयर ऑफ कॅस्टरब्रिज'-मधील दारूच्या धुंदींत स्वतःच्या पत्नीचा लिलाव मांडणारा आरंभींचा नायक हेंचार्ड, आणि शेवटीं अनिकेत अवस्थेंत मृत्यूचा मुक्त मनानें स्वीकार करणारा अखेरचा हेंचार्ड, या दोन्ही व्यक्ती एकच खऱ्या. त्यांच्यांतील फरक हा केवळ अंशांचा नसून जातीचा (difference of kind, not of degree) आहे. आरंभींचा हेंचार्ड कोठल्याहि कामगारांच्या मोहल्ल्यांत केव्हांहि पाहावयास सांपडतो. पण अखेरच्या हेंचार्डचा शोध हार्डीच्या कादंबरींतच घ्यावा लागतो. श्री. बेडेकर ज्या 'संपूर्णत्वा'चा उल्लेख करतात, तें मानवी संपूर्णत्व आन्तरकालाच्या गतिमत्तेच्या दृष्टीनें मान्य करतां येईल. परंतु ही प्रक्रिया नायकाच्या व्यक्तिगत जीवनांत घडत असल्यानें, त्यांनीं त्यावर लादलेला सामाजिक आशय मान्य करतां येत नाहीं. ज्याच्या आत्मिक शक्तींचा विकास खुरटत आहे असा नायक, जीवनमरणाची समस्या निर्माण होतांच स्वतःमधील संहारक शक्तींशीं सामना देऊन पूर्णत्वाकडे प्रवास करूं लागतो, त्या वेळीं त्या नायकाचे सहप्रवासी झालेल्या रसिकांचाहि खुरटलेला आन्तरकाल, क्षणापुरतां का होईना, पण मुक्त होऊन कल्पनेच्या पंखानें पुढें जाऊं लागतो. आणि म्हणून रसिकांना दुःखयातनेचा अनुभव येत असतांनाच अनिर्वचनीय अशा मुक्ततेचा आणि संपूर्णत्वा-(integration)-चा आनंद प्राप्त होतो.

### मुक्त, काव्यात्म मनाचें दर्शन

या विवेचनांतून ट्रॅजिडी म्हणजे केवळ अंध नियतीनें एका असामान्य जीवाची केलेली निर्दय पारध नसून, स्वतःमधील संहारक शक्तींशीं मुकाबला करून








आत्मशुद्धि आणि आत्मविकास घडवूं पाहणाऱ्या, आणि या संग्रामांतून आत्मिक शक्तींच्या पुनर्जन्मानें मुक्तावस्थेला पोंचूं पाहणाऱ्या एका काव्यात्म मनाचें दर्शन आहे, याची मार्मिक रसिकांना स्पष्ट जाणीव होईल. ट्रॅजिडीच्या विवेचनांत ॲरिस्टॉटल्-प्रणीत 'कॅथार्सिस्' (शुद्धीकरण) या संज्ञेचा विचार कां व कोठें संभवतो, त्याचाहि यावरून स्पष्ट उलगडा होतो. 'कॅथर्सिस्' म्हणजे समजशक्तीला आलेलें मांद्य आणि संवेदनशक्तीवर चढलेली काजळी झटकून टाकण्याचा, म्हणजेच शुद्धी-करणाचा व्यक्तीनें केलेला प्रयत्न. परंतु रसिकांच्या मनाचें असें शुद्धीकरण होण्यापूर्वी ट्रॅजिडींतील नायकाचें (आणि कलावंताचेंहि) शुद्धीकरण झालेलें असतें.

शेक्सपिअरच्याच ट्रॅजिडीचें उदाहरण घेतलें असतां हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. शेक्सपिअर-च्या ट्रॅजिडींतील बहुतेक सर्व नायक तीव्रतर मनस्तापानंतर मृत्यु पावतात हें खरें. पण त्यापूर्वी बहुतेक सर्व नायकांच्या आत्मिक शक्तींचा विकास पूर्णत्वाला पोंचलेला असतो. जेथें हा विकास संपुष्टांत येतो, तेथें शारीरिक मृत्यूपूर्वींच आत्मिक मृत्यु घडलेला असतो. लेडी मॅक्बेथच्या मृत्यू-बरोबरच वस्तुतः मॅक्बेथचा आत्मिक मृत्यु घडतो. आणि नंतर पाशवी क्रूरतेपलीकडे मॅक्बेथजवळ दुसरें कांहींहि उरत नाहीं. परंतु 'मॅक्बेथ' या नाटकांतील रसिकांच्या दृष्टीनें आकर्षणीय भाग कोणता असेल, तर डंकनच्या खुनापूर्वी आणि नंतर मॅक्बेथच्या अन्तर्मनांतील सृजक आणि संहारक शक्तींचा तुंबळ रणसंग्राम आणि त्यांतून मॅकबेथच्या वृत्तींचा होणारा विकास, हाच आहे यांत शंका नाहीं. पण अशीं कांहीं उदाहरणें सोडलीं, तर इतर शेक्स्पीरिअन् ट्रॅजिडींतील नायकांचे मृत्यु आणि अन्तकाळीं त्यांनीं काढलेले उद्‌गार हे व्यक्तित्वाला पूर्णत्व आलेल्या मुक्त मनाचे उद्‌गार आहेत याचा प्रत्यय येतो. आत्मस्तुतीनें हुरळून जाणारा पहिल्या अंकांतील पोरकट म्हातारा लिअर, अनंत मनस्तापां-तून विकसित होत होत, नाटकाच्या अखेरीस तडफड करीत नव्हे, तर शांतपणें मृत्यूचा स्वीकार करतो. स्वतःच्या मनस्तापाकडे तो अंध नियतीचा अन्याय म्हणून पाहात नाहीं, तर "...Upon such sacrifices, my Cordelia, the gods themselves throw incense...." असें मानण्याची भव्य दृष्टि त्याला प्राप्त होते. जगांतील दुःखामागील दुष्टपणा मूर्खपणांतून, अज्ञानांतून आणि खुरट्या मनोवृत्तींतून निर्माण झाला आहे याची विशाल जाणीव त्यास होते. म्हणूनच ऑथेल्लो स्वतःच्या आत्मघातापूर्वी जखमी झालेल्या आयोगो-ला उद्देशून 'खुरट्या जीवनापेक्षां मुक्त मनानें स्वीकारलेला मृत्यु श्रेष्ठतर आहे' असें उद्‌गारतो. तो म्हणतो, "...I'd have thee live; for in my sense, it's happiness to die...". सर्वसामान्य माणसाप्रमाणें जीवनाला वैतागलेल्या माणसाचे हे उद्‌गार नाहींत. कारण स्वतःच्या उरांत कट्यार खुपसून घेतल्यानंतर ऑथेल्लो आपल्या प्रिय पत्नीच्या शवावर पडून तिचें अखेरचें चुंबन घेतांना उद्‌गारतो "...I kissed thee ere I killed thee, no way but this, killing my-self to die upon a kiss...". 'अँटनी अँड क्लीओपात्रा' या नाटकांतील क्लीओपात्राचा विकास तर याहूनहि अधिक अर्थपूर्ण आहे. आपल्या सौंदर्यानें मोठमोठ्या सरदारांना हातावर खेळवणारी लावण्यमयी क्लीओपात्रा, अँटनीच्या जीविताशीं खेळतांना पहिल्या चार अंकांत वस्तुतः क्रूर वार-योषितेपेक्षां निराळें असें कांहीं करीत नाहीं. परंतु तिच्यावरील प्रीतीमुळें चौथ्या अंकाच्या अखेरीस अँटनीनें मृत्यु स्वीकारलेला पाहतांच ती मुळापासून हादरून जाते. आणि पांचव्या अंकांत तिच्या आन्तरशक्ती जागृत होऊन तिचें व्यक्तित्व संपूर्ण बदलून जातें. तिच्या मनांतल्या वारांगनेचा संहार होतो आणि प्रियकरावरील उत्कट भक्तीनें मृत्यूचा स्वीकार करणारी दिव्य प्रेयसी जन्माला येते. मृत्यूपूर्वी ती अँटनीच्या मृतात्म्याला उद्देशून उद्गारते "...Husband, I come! Now to that name my courage prove my title! I am fire and air; my other elements I give to baser life...." ट्रॅजिडींतील नायकांच्या अन्तकाळच्या या उद्‌गारांना उद्देशून टी. एस्. ईलीअट यांनीं 'cheering up'








असें त्यांचें वर्णन केलें आहे. या अन्तकालीन उद्गारामागील विशाल मानसशास्त्रीय घडामोड पाहिली असतां, 'नायकांनीं अन्तकाळीं केलेलें स्वसमर्थन' हें प्रा. क्षीरसागरांचें त्यावरील भाष्य किती उथळ आहे याचा प्रत्यय येतो.

## पांगळ्या आंतरशक्तींना जीवनसत्त्वाचा लाभ

नायकाच्या आंतरमनांतील संहारक आणि सृजक शक्तींतील झुंज, त्याच्या आत्मिक शक्तीची जागृति आणि खुरटेपणांतून पूर्णत्वाकडे चाललेली त्याच्या आंतरकालाची गति, या सर्व प्रक्रियेंत सामान्य रसिक सविकल्प समाधीमुळें अशा नायकाचा सहप्रवासी होतो. रुग्णाइत शरीराला जीवनसत्त्वामुळें जसा तजेला यावा, तसा या प्रक्रियेंत पांगळ्या आंतरशक्तींना जीवनसत्त्व लाभून जिवंतपणा येतो. आणि रसिकांना ट्रॅजिडीबद्दल वाटणाऱ्या आकर्षणाचें मर्म इथेंच आहे. ल्यूकस-सारखे टीकाकार सांगतात त्याप्रमाणें ट्रॅजिडी म्हणजे केवळ अनुभूतींचा वर्षाव (' Experience, ever more experience is our craving.) नव्हे. या अनुभूतींतून व्यक्तित्वाच्या विकासाची धडपड आणि मानवी पूर्णतेला पोंचण्याची प्रेरणा, हाच ट्रॅजिडीच्या आकर्षणाचा गाभा आहे यांत शंका नाहीं. या प्रक्रियेंत ट्रॅजिडींतील नायकाबरोबर त्याला जन्म देणारा कलावंत आणि त्याचा सहप्रवासी होणारा रसिक यांच्यांतहि परिवर्तन होऊं लागतें. आणि म्हणून साहित्यसंसारांत एकामागोमाग एक अशा भीषण ट्रॅजिडी निर्माण करणारा शेक्सपिअरहि निर्मितीच्या अखेरच्या अवस्थेंत ('रोमान्सेस्' मध्यें) 'टेंपेस्ट' मधील प्रॉस्पेरोच्या रूपानें स्वतःच्या संपूर्णत्वाचा आणि मुक्ततेचा आविष्कार करतो. अशा कलावंतांना 'महर्षि' अशी संज्ञा देण्यांत येते, त्याचें कारण तरी हेंच आहे.

लिअर, हॅम्लेट, मॅक्बेथ इत्यादि नायकांना जें संपूर्णत्व मनस्ताप आणि मृत्यु यांच्या मोलानेंच लाभलें, तें प्रॉस्पेरोला जीवनसाधनेंतून प्राप्त होतें. कारण ट्रॅजिडींतील नायकांत होणारें परिवर्तन प्रॉस्पेरो-प्रमाणें संथ उत्क्रांती-( evolution )नें होत नाहीं, तर प्रचंड उत्पात ( revolution ) होऊन घडतें. त्यामुळेंच अखेरच्या क्षणीं झालेला मुक्तीचा दिव्य साक्षात्कार त्यांच्या दुबळ्या शरीरांना पेलवत नाहीं. म्हणून हे नायक अपघातानें वा तलवारीनें मृत्युमुखीं पडले नसते, तरी लिअरप्रमाणें भग्न-हृदय होऊन त्यांना मृत्यु आलाच असता. अखेरच्या क्षणीं ट्रॅजिडींतील नायकांना होणारा साक्षात्कार हा, कुरुक्षेत्रावर भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाला दाखविलेल्या विश्वरूप दर्शनामुळें झालेल्या साक्षात्काराप्रमाणें भव्य आणि गलितगात्र करणारा असतो. त्यामुळेंच ट्रॅजिडींतील नायकाचे सह-प्रवासी झालेले रसिकहि, त्या नायकाप्रमाणें अनुभूती-च्या अखेरीस विराट् जीवनदर्शनामुळें शरीरानें आणि मनानें गलितगात्र ( exhausted ) होतात. या अनोळखी पण देदीप्यमान प्रदेशांत कल्पनेच्या पंखावरून उतरल्यावरच रसिकांना महान् लेखकांच्या माहात्म्याची ओळख पटते, आणि पर्यायानें त्यांना स्वतःचाच खरा शोध लागतो. म्हणूनच स्थूल-मानानें कला, आणि कलेचा एक दैदीप्यमान पैलू म्हणून ट्रॅजिडी, ही केवळ कलावन्त आणि रसिक यांची आत्माविष्काराची वा आत्मनिवेदनाचीच नव्हे, तर आत्मविकासाची आणि मुक्तीची धडपड आहे असें मानावें लागतें. ट्रॅजिडीचा जन्म, ट्रॅजिडीची प्रक्रिया आणि ट्रॅजिडीचा परिणाम, इतक्या सूक्ष्म अर्थानें व्यक्तिवादी आणि इतक्या भव्य अर्थानें सामाजिक आहे.

---








## करुणनाट्यानें आनंद कां व्हावा ?

# २. मानवी अंतरात्म्याची पूर्णत्वाविषयींची ओढ

कु. चं. श्री. कर्नाटकी

श्री. दि. के. बेडेकरांच्या लेखावरून करुण-नाट्याबद्दलची त्यांची जी कल्पना व्यक्त होते ती माझ्या मतें अशी आहे : करुणरसाबद्दल आपल्या मनांत एक प्रकारें पारंपरिक आदर निर्माण झाला आहे व तो नितान्त आदर करुणनाट्यापासून मिळणाऱ्या आनंदाचें रहस्य होय. एखाद्या उच्च ध्येयासाठीं बलिदान करण्याचें एक ' उदात्त वेड ' कांहीं थोर व्यक्तींना असतें. त्या ध्येयाप्रीत्यर्थ आमरण आत्यन्तिक हालअपेष्टा सोसून त्या अनन्तांत विलीन होतात. अशा उदात्त जीवनाचें चित्रण आपल्याला चटका लावतें असें बेडेकरांचें म्हणणें आहे.

प्रा. क्षीरसागर ' ट्रॅजिडी' ला ' भीषण नाट्य ' म्हणतात. पण हें नांवहि अगदीं पूर्णतया समर्पक नाहीं, असेंच त्यांना वाटत असल्यावरून ते ' ट्रॅजिडी ' हाच शब्द वापरतात. त्यांच्या मतें ट्रॅजिडीमधील करुणरसापेक्षां तीमधील भयानक रसाचा आविष्कार हें करुणनाट्यापासून होणाऱ्या आनंदाचें मूळ आहे. उमदा मानव व अंध नियति यांच्या अखंड झगड्यामुळें भयानकता निर्माण होते; व श्रेष्ठ प्रतीच्या ट्रॅजिडीचा उद्देश मानवी मनांतील वृथाहंकार नरम आणणें, मानवी दुःख सुसह्य करणें व मानवी मनाला ईश्वरी इच्छेपुढें मान लववावयास शिकविणें हा होय, असेंहि ते म्हणतात.

### प्रेक्षकाची प्रतिक्रिया बरीचशी व्यक्तिनिष्ठ

' ट्रॅजिडी ' हा शब्द फक्त नाट्यालाच लावण्याचें कारण नाहीं. वाङ्मयाच्या कोणत्याहि प्रकारांत, कथा-कादंबरींतसुद्धां, ज्याला ट्रॅजिडी म्हणतां येईल असें जीवनचित्रण येऊं शकेल. ज्याअर्थी फक्त शोकान्तक नाटक नव्हे, तर शोकान्तक कादंबरी किंवा कथासुद्धां आपल्याला पुनः पुनः वाचण्या-इतकी आवडूं शकते, त्याअर्थी या वादापुरता त्यांचाहि समावेश करण्यास मला कांहीं हरकत दिसत नाहीं.

' ट्रॅजिडी ' हा वाङ्मयप्रकार पाश्चात्त्य असून तो आंग्ल वाङ्मयाच्या अभ्यासाबरोबर आपण आत्मसात् केला आहे, हें श्री. क्षीरसागरांचें मत अगदीं बरोबर आहे. आपल्यावर पाश्चात्त्य भाषेबरोबर पाश्चात्त्य विचारांचा पगडा बसून आपल्या कल्पनां-ना व वाङ्मयनिर्मितीला पाश्चात्त्य वळण लागावें, ही एक स्वाभाविक घटना आहे. परंतु कोणतीहि कलाकृति घेतली तर तिच्यामागचा हेतु, तिच्या निर्मितीचें तंत्र, तिचा विषय, कलानिर्मात्याच्या मनावरील संस्कार, व त्याची वैयक्तिक मानसिक, भावनात्मक पार्श्वभूमि यांपैकीं कशावरहि ती कला-कृति पाहाणाऱ्यांच्या मनाची प्रतिक्रिया सर्वस्वीं अवलंबून नसते. ती प्रतिक्रिया बरीचशी व्यक्तिनिष्ठ ( subjective ) असते. पाहणाऱ्यांच्या शक्तीवर व प्रवृत्तीवर ती अवलंबून राहते. म्हणून ' ट्रॅजिडी ' या वाङ्मयप्रकाराच्या उगमाची उपपत्ति जगांतल्या कोणत्याहि टीकाकारानें आपआपल्या कल्पनेप्रमाणें बसवली तरी ' प्रेक्षकाला आनंद कां होतो ? '— या प्रश्नाचें उत्तर त्या उपपत्तीच्या अभ्यासानें मिळणार नाहीं. यामुळें प्रा. क्षीरसागरांच्या लेखांत करुणनाट्यानें आनंद कां व्हावा याचें उत्तर सांपडत नाहीं. ट्रॅजिडीची प्रेक्षकांच्या मनावरची पकड ( appeal ) ही प्रेक्षकाच्या स्वतःच्या मानसिक, बौद्धिक व सांस्कृतिक पार्श्वभूमीवर अवलंबून राहील व ती प्रेक्षकांच्या संख्येइतकीच अनंत प्रकारची असूं शकेल. तथापि, ' राष्ट्र 'रूपी एकाद्या जनसमूहाची सांस्कृतिक पातळी व मनःप्रकृति कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत सारखी असते, त्यामुळें अशा जनसमूहा-मध्यें एकाद्या कलाकृतीच्या दर्शनानें उत्पन्न झालेल्या प्रतिक्रियेचें स्वरूप बव्हंशीं एक असलें पाहिजे. याच दृष्टीनें ' ट्रॅजिडी ' या वाङ्मयप्रकाराचें भारतीय साहित्यांतील महत्त्व व लोकप्रियता यांची कारणमीमांसा लावावी लागेल.

### बलिदान पाहून जीवनमूल्यांचा अर्थ कळतो

ट्रॅजिडी म्हणजे मनुष्यजीवनाचें चित्र असतें;








एकाद्या व्यक्तीच्या जीवनाचा तो इतिहास असतो. आणि तो अशा प्रकारच्या व्यक्तीच्या जीवनाचा इतिहास असतो कीं, ज्या व्यक्तीचें व्यक्तिमत्त्व कांहीं वरच्या दर्जाचें आहे, जी गुणांनीं, कृतीनें, वृत्तीनें, कीर्तीनें समाजाच्या डोळ्यांत भरण्यासारखी आहे, परंतु जी ' मानव ' आहे. ट्रॅजिडीचा नायक ' मानव ' असल्यामुळें कांहीं ना कांहीं दौर्बल्य किंवा खोड त्याच्यांत असते व तिची त्याच्या व्यक्तित्वावर छाया असते. शेवटीं बहुंशीं त्या खोडीमुळेंच त्याचा हळू हळू अधःपात होऊन नाश झालेला दिसतो.

हीच माझी ट्रॅजिडीची व्याख्या आहे. सावित्री, हरिश्चन्द्र इत्यादींचें उदाहरण श्री. बेडेकरांनीं दिलें आहे. पण या व्यक्तींचें जीवन ट्रॅजिडी नव्हे. कारण त्या व्यक्ती पराभूत झालेल्या नाहींत. धर्म, भीष्म किंवा भगतसिंग किंवा महात्मा गांधी यांचें जीवन शोकान्त नाहीं. संकटांच्या मार्‍यांतूनहि ज्या व्यक्ती निभावून वर निघाल्या, त्यांचें जीवन ट्रॅजिडी नव्हे. ' एकच प्याला ' ही ट्रॅजिडी. करुणाची ज्यांत छटा आहे, तें करुणनाट्य म्हणतां येणार नाहीं. म्हणून करुणरसाबद्दल आम्हां भारतीयांच्या मनांत आदर व भक्ति आहे, हें श्री. बेडेकरांचें म्हणणें खरें असलें, तरी त्यामुळें करुणनाट्यापासून आनंद होतो हें त्यांचें मत मला पटत नाहीं. समाजाला वळण देण्याचें, जगाचा उद्धार करण्याचें, बलिदान देण्याचें ज्याला वेड असतें, त्याच्या जीवनावर आधारलेलें नाटक ( किंवा कथा ) आपल्याला आवडलें, पुनः पुनः पाहावेसें वाटलें, तर ती आश्चर्याची, कुतूहलाची गोष्ट नाहीं. असा नायक दुःखाला डरत नाहीं, उलट दुःखावर मात करतो आणि शेवटीं विजय मिळवितो. त्याचा मृत्यु म्हणजे त्याचा ' नाश ' नव्हे. म्हणूनच आपल्याला त्याचें जीवन आवडतें. त्याच्या जीवनापासून उत्साह व स्फूर्ति मिळते. मानवी जीवनाच्या विशिष्ट मूल्यांचा अर्थ कळतो. आणि मनाला स्वाभाविकच जी एक जीवनाबद्दलची जिज्ञासा असते, तिची पूर्ति झाल्याचें व ज्ञानलाभाचें गूढ समाधान मिळतें.

प्रश्न असा आहे कीं, ज्यांना विशिष्ट बलिदान करण्याची वा समाजोद्धाराची कल्पनाहि शिवलेली नाहीं अशा सुधाकराचा किंवा संभाजीचा हाल भोगून शेवटीं दारुण अंत झालेला पाहायला आपल्याला कसें आवडतें ?

प्रा. क्षीरसागर म्हणतात, मानवाचा नियतीशीं होणारा संघर्ष, व त्यांतून प्रतीत होणारी मानवी प्रयत्नांची निष्फळता यांचें एक भयभीत करणारें चित्र ट्रॅजिडीच्या रूपानें रेखाटलेलें असतें. कितीहि टक्कर देणारा झुंझारसुद्धां नियतीपुढें चीत होतो असें आपण ट्रॅजिडीमध्यें पाहतो. पण श्री. क्षीरसागरांच्या म्हणण्याप्रमाणें ' सज्जनांवरील संकटें व सत्प्रवृत्तांनाहि विनाशकालीं होणारी विपरीतबुद्धि ' इतकेंच फक्त ट्रॅजिडींत पहायला मिळत असतें, तर असा वाङ्मप्रकार लोकप्रिय होण्याऐवजीं कधींच नामशेष होऊन गेला असता !

### मानवाच्या अपूर्णतेचें दर्शन

पण ट्रॅजिडीला आतां भारतांत स्थैर्य आलें आहे व तिची रसिकजनांवर चांगलीच पकड आहे. शिवाय उत्तम ट्रॅजिडी म्हणून ज्या आपल्या डोळ्यांसमोर आहेत, त्यांतील कोठल्याहि नायकाचा नाश नियतीच्या प्रभावानें झालेला नाहीं. तो त्याच्या स्वभावगुणांतल्या एका छिद्रानें झाला आहे. ट्रॅजिडीचा नायक चांगलें कळत असूनहि एखाद्या दुर्गुणाच्या सर्वस्वीं अधीन झालेला दिसतो, आणि सर्व प्रकारें तो कमनीय असूनहि त्या दुर्गुणाच्या कचाट्यांतून सुटण्यासाठीं लागणारा मनाचा खंबीरपणा तेवढा त्याच्याजवळ नसतो. त्यामुळें हळूहळू खालीं खालीं येत शेवटीं तो नाश पावतो. एखाद्या दुर्गुणाचा इतका पगडा माणसावर आणि इतर सर्व दृष्टींनीं चांगल्या सुज्ञ असलेल्या माणसावर बसावा हा फार तर नियतीचा प्रभाव म्हणा ! पण ट्रॅजिडीमधील नायकावर आपत्ती येतात त्या केवळ दैवयोग म्हणून आलेल्या नसतात. त्या आपत्तींचें मूळ त्याच्या स्वभावांतील त्या विशिष्ट वैगुण्यांत असतें. म्हणून ट्रॅजिडी ही मानव व नियति यांच्यामधील संग्रामाचें चित्र नव्हे. तें मनुष्याच्या अपूर्णतेचें, तो ' मनुष्य ' असल्यानें एखाद्या क्षुल्लक बाबतींतल्या कां होईना मानवी मनोदौर्बल्याचें चित्र होय.

दुर्दैवाच्या फेर्‍यांत सांपडून वावटळींतल्या








पाचोळ्यासारखीं भिरकावलीं जाणारीं माणसें जगांत नाहींत असें नाहीं. पण त्यांचें वाङ्मयांतलें स्थान वेगळें. एक तर प्रत्यक्ष जगांत घडत असलेल्या अशा दुर्दैवी घटनांची जंत्री देणारी कलाकृति निर्माण करण्यासाठीं लागणारी प्रतिभा व मानवी मनाच्या सूक्ष्म शक्तींचें व नाजूक क्रियाप्रतिक्रियांचें विश्लेषण करण्यासाठीं लागणारी प्रतिभा यांत फरक आहे. म्हणूनच 'रोमिओ ॲन्ड ज्यूलिएट'चा नंबर 'किंग लिअर' किंवा 'ऑथेल्लो'बरोबर लागत नाहीं. दुसरें असें कीं, अशा दुर्दैवी घटनांवर आधारलेली कथा ( किंवा नाटक ) जनमनाची पूर्ण पकड घेत नाहीं. दैवी आपत्ति कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत प्रत्यहीं मनुष्य पाहत असतो. तशाच आपत्ती रंगभूमीवर पाहण्यांत त्याला कांहीं स्वारस्य वाटत नाहीं. नियतीशीं प्रत्येक मनुष्य आपआपल्या परी प्रत्यक्ष जीवनांत झगडतच असतो. म्हणून तशाच प्रकारच्या झगड्यांत एखादा नायक सांपडून शेवटीं तो जमीनदोस्त झाल्याचें पाहावयाची मनुष्याला ओढ लागत नाहीं.

पण कथारूपानें असो कीं नाटयरूपानें असो, सुधाकरासारख्याच्या ट्रॅजिडीचें वाङ्मयांत अढळ स्थान आहे.

कथा-कादंबरी वाचण्यांत किंवा एखादें नाटक पाहण्यांत माणसाची अगदीं मुळांतील इच्छा करमणूक मिळण्याची असते. कुवतीच्या, ज्ञानाच्या, प्रगल्भतेच्या व मनःप्रवृत्तीच्या निरनिराळ्या दर्जा-प्रमाणें करमणुकीचें केंद्र अर्थात् निरनिराळें असतें. बालगंधर्वांच्या अभिनयासाठीं नाटकास जाणारे पण अखेरीस सिंधूचा व तिच्या संसाराचा शेवट पाहून अत्यंत उद्विग्न मनानें बाहेर पडणारे प्रेक्षक पुष्कळच आहेत. घटकाभर करमणुकीसाठीं जायचें अन् असलें दुःखदायक दृश्य काय पाहायचें, असें त्यांना वाटतें. शोकान्त कादंबरीबद्दलहि असाच अनुभव आहे. हे प्रेक्षक व वाचक जीवनसागराच्या पृष्ठभागावरच तरंगत असतात.

ट्रॅजिडी आवडते ती निराळ्या दृष्टीनें पाहणाऱ्यांना. लोक जीवनांत खोल उतरून पहात असतात. हरघडीला घडणाऱ्या घटनांचा व मानवी शक्तीचा अर्थ पाहण्याची त्यांची वृत्ति असते. ह्या माणसांना शोकान्त कथा किंवा नाट्य यांकडे पाहत असतांना स्वतःच्या प्रत्यक्ष जीवनाचा, परिस्थितीचा, पूर्ण विसर पडलेला असतो. सर्व उपाधींपासून व मनोविकारांपासून अगदीं अलिप्त असा त्यांचा अंतरात्मा तेवढा जागृत असतो व तो नायकाशीं तद्रूप झालेला असतो.

### सहानुभूतिभावनेची पूर्ति

आपल्याला ट्रॅजिडी आवडते ती यामुळें. अंतरात्मा म्हणजे ईश्वरी अंशच. त्या ईश्वरी अंशा-( godliness )ला मनुष्यमात्राबद्दल सहानुभूति असते. किंबहुना प्राणिमात्राबद्दल सहानुभूति हा त्या अंशाचा गुणधर्म आहे. या सहानुभूतीचा जगांतल्या, प्रत्यक्ष जीवनांतल्या अनेक आघातांनीं व आवरणांनीं कोंडमारा होतो, आणि म्हणून तिला वाव देण्याची अंतरात्म्याला ओढ ( craving ) असते. व्यक्तित्वाच्या एखाद्या कोंपऱ्यांत वास्तव्य करून बसलेल्या, व अखेर नाशाला कारण होणाऱ्या मनोदौर्बल्यामुळें नाश पावणारा धीरोदात्त नायक अशा प्रकारच्या संवेदना उत्पन्न करतो कीं, ईश्वरी अंशामुळें जागृत असलेल्या सहानुभूतीला इष्ट तो विषय मिळून अंतरात्म्याची जी ओढ (craving) तिचें समाधान होतें. नायक 'मानव' असल्यामुळें अपूर्णतेमुळें उत्पन्न झालेल्या उणीवेला तो बळी पडला आहे, हें दृश्य अंतःकरणाला भिडतें, व सहानुभूतीची पूर्ति होते.

फक्त नियतीच्याच प्रभावापुढें मनुष्य हतबल होऊन नाश पावत आहे, अशी घटना माणसांतील ईश्वरी अंशाला सहन होत नाहीं. इनॉक आर्डनचें जीवनचित्र पाहून मनावर ताण पडतो. इनॉकचा साधेपणा, सरळपणा, नितान्त प्रेम, त्याचा सात्त्विकपणा पूर्णत्वाकडे नेणारा आहे. या गुणांवर सर्वस्वी अनपेक्षित व मनुष्याला टाळतां येणार नाहींत अशा कांहीं घटनांची मात होते, हें पाहून सहानुभूति जागृत होते खरी, पण ती तात्पुरती. 'दैव' नांवाची शक्ति मनुष्यावर, सात्त्विक प्रकृतीच्या गुणांवर एकसारखा जय मिळवीत राहूं शकेल, हें माणसांतील ईश्वरी अंशाला पटतच नाहीं. उलट पक्षीं, मनुष्यामधील मनुष्यत्वाच्या अपूर्णतेमुळें उत्पन्न होणाऱ्या दुःखाची व नाशाची सत्यता








पटते. तें दुःख व नाश टाळायचा असेल, तर मानसिक शक्ति कमवावी लागते हें पटतें. व ती शक्ति कमावण्याची तयारीसुद्धां मनुष्य मानवी दुर्बलतेमुळेंच करीत नाहीं, हेंहि पटतें. या ठिकाणीं जिव्हाळ्याची, स्वानुभवाची संवेदना होते, म्हणून त्या संवेदनेनें सुख होतें.

'इतकीच एक उणीव या माणसांत नसती तर किती चागलें झालें असतें!' असें ट्रॅजिडीच्या नायकाबद्दल मनांत येत राहतें. अंतरात्म्याला पूर्णत्वाकडे पोंचण्याची जी प्रबल ओढ असते, तीमुळें पूर्णत्वाकडे जाऊं पाहाणाऱ्या नायकरूपी मानवाच्या अडचणींची त्याला ओळख पटते. नायकाशीं प्रेक्षक समरस होतो. दोहोंमध्यें आत्यन्तिक आपुलकी निर्माण होते; व या आपुलकीमुळें समदुःखी नायकाच्या सांनिध्यांत गोडी वाटते. दूर रहाणारीं प्रेमाचीं माणसें एकमेकांना भेटल्यावर परस्परांच्या दुःखाच्या गोष्टी ऐकून होणारी सुखसंवेदना ती हीच.

**नायकाच्या चित्तशुद्धीवर आपलें लक्ष केंद्रित**

विश्वांत संघर्षांतूनच प्रगति होत असते. या तत्त्वाची अनेक अनुभवांवरून माणसाला सत्यता पटली आहे. सुखलोलुपतेचा माणसावर पगडा असल्यामुळें, सुखाचें फळ झाडावर चढल्याशिवाय हातीं लागेल तर बरें, अशा प्रकारच्या इच्छेपुढें मान वाकवतां वाकवतां तो सुखाधीन बनलेला असला, तरी संघर्षाशिवाय, झगडल्याशिवाय, त्रास सोसल्याशिवाय प्रगति अशक्य आहे, हें त्याला मनोमन माहीत असतें. चांगल्यावाईट मनोविकारांचा, सुखदुःखांचा लढा उत्पन्नच न होईल तर बरें असें त्याला क्षणभर वाटलें तरी हें शक्य नाहीं हें तो जाणून असतो. लढ्यांत मनापासून पडून चांगल्याचा वाईटावर जय व्हावा अशी धडपड करूनच आपल्याला पुढें जायला मिळेल, हें त्याला ठाऊक असतें. कारण या धडपडींत शौर्य असतें. मनुष्याच्या मनुष्यपणाला तें आव्हान असतें. अनादिकालापासून चालत आलेल्या जीवनांतील झगड्यांतच मानवाच्या प्रगतीचें व यशाचें बीज आहे. कष्टांतून, दुःखांतूनच पूर्णत्वाचा मार्ग आहे. पूर्णत्वासाठीं चित्तशुद्धीची जरूरी आहे. दुःख हें चित्तशुद्धीचें साधन होय. स्वतःच्या स्वभावांतल्या एकाद्या छिद्रामुळें नायक नाश पावलेला आपण रंगभूमीवर पाहतों. पण खरोखर आपल्या अंतरात्म्याची—अंतर्मनाची नजर त्याच्या नाशावर नसते. ती आपत्तींना तोंड देतां देतां त्याची झालेली प्रगति, चित्तशुद्धि यांवरच लागलेली असते. त्याचें वाईट काय झालें हें पाहाण्यापेक्षां त्याचें चांगलें किती झालें, त्याचें पाऊल पुढें किती पडलें, हेंच पाहाण्यांत अंतर्मन गुंतलेलें असतें. नायकाच्या अपूर्णत्वावर तें केंद्रित होऊन राहात नाहीं. तो दुःख भोगीत भोगीत अधिकाधिक 'शुद्ध', सात्त्विक, होऊन, पूर्णत्वाच्या अधिक जवळ गेला आहे, हेंच त्याला दिसतें व या दृश्यांत तें रंगून जातें. म्हणून सुख होतें. सत्यान्वेषी आत्म्याला कष्टाशिवाय प्रगति नाहीं या तत्त्वाची सत्यता पुनः एकवार प्रस्थापित झाल्याचें पाहून समाधान होतें.

ही करुणनाट्यापासून होणाऱ्या आनंदाची माझी कारणमीमांसा आहे.

---

## प्रजासूययज्ञाचा आविष्कार

दोन किंवा अडीच हजार वर्षांपासून प्रसिद्ध अशा या क्षेत्रांत अश्वमेधयज्ञाच्या घोड्याप्रमाणें मीहि भूमिदानयज्ञाचा घोडाच जणूं फिरत आलों आहे. महाभारतांत राजसूययज्ञाचें वर्णन आहे. माझा यज्ञ प्रजासूययज्ञ आहे. यांत प्रजेला राज्याभिषेक होईल : असें राज्य जिथें मजूर, किसान, भंगी इत्यादि सर्व मानतील कीं आम्ही राजे आहोंत!—अशा समाजाचें नांव सर्वोदय आहे. तिथूनच प्रेरणा घेऊन मी फिरत आहें.

—आचार्य विनोबा, राजघाट (दिल्ली) येथें केलेल्या भाषणांतून








# भारतीय अर्थशास्त्र-परिषदेचें पाटणा येथील अधिवेशन

अखिलभारतीय अर्थशास्त्र-परिषदेचें ३४ वें अधिवेशन पाटणा येथें डिसेंबर १९५१ च्या २३,२४ व २५ या तारखांस भरलें होतें. पाटणा शहराच्या परिसरांतच आर्यचाणक्यानें आपलें अर्थशास्त्र लिहिलें असावें अशी प्रसंगोचित आठवण बिहारचे राज्यपाल श्री. मा. श्री. अणे यांनीं आपल्या उद्‌घाटन-प्रसंगींच्या भाषणांत करून दिली. 'भारतीय उद्योग-संरक्षण समिती'-( Indian Tariff Board ) चे अध्यक्ष डॉक्टर हिरेंद्रलाल डे हे अधिवेशनाचे अध्यक्ष होते. अर्थशास्त्रज्ञांच्या परिषदेंत अर्थशास्त्रांतील कांहीं तात्त्विक प्रश्नांचा विचार व्हावा अशी अर्थातच अधिवेशनाची अपेक्षा होती. परंतु सध्यांच्या आर्थिक अस्थिरतेच्या काळांत चालू महत्त्वाच्या व्यावहारिक आर्थिक प्रश्नांकडे अधिवेशनानें अधिक लक्ष पुरविणें साहजिक व अगत्याचेंहि होतें. भारतापुढें असलेल्या महत्त्वाच्या आर्थिक प्रश्नांपैकीं सर्व प्रश्नांची संपूर्ण चर्चा तीन दिवसांच्या कालावधींत करणें अर्थातच अशक्य होतें व तसा प्रयत्नहि पण करण्यांत आला नाहीं. परंतु अधिवेशनापुढें चर्चिण्यांत आलेले प्रश्न आजच्या परिस्थितींत अत्यंत महत्त्वाचे असेच होते.

अधिवेशनांत ज्या प्रश्नांचा विचार करण्यांत आला ते असे होते : ( १ ) भारतांतील वस्तूंची भाववाढ व त्यावरील उपाययोजना. ( २ ) भारताच्या पंचवार्षिक योजनेचा आराखडा. ( ३ ) सरकारच्या अंदाजपत्रकी व आर्थिक ( fiscal and financial ) धोरणाचें आर्थिक नियोजनांत स्थान. ( ४ ) भारतांतील जमीनधारा-पद्धति व त्यांतील सुधारणा. ( ५ ) भारतांतील आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण.--यांपैकीं क्रमांक ३, ४ व ५ हे विषय या अधिवेशनांत चर्चेसाठीं घेण्यांत येतील असें गत-वर्षींच्या अधिवेशनांत जाहीर करण्यांत आलें होतें. या तीन विषयांवर अभ्यासकांनीं आपापले निबंध तयार करून अधिवेशनापुढें चर्चेसाठीं मांडले होते. पंचवार्षिक योजनेवरील चर्चा या अधिवेशनांत होईल असें त्या योजनेचा आराखडा प्रसिद्ध झाल्यानंतर जाहीर करण्यांत आलें. प्रत्यक्ष चर्चेच्या वेळीं वरील क्रमांक ३ ह्या विषयावरील चर्चेचाहि समावेश पंचवार्षिक योजनेवरील चर्चेंतच करण्यांत आला. याखेरीज भारतांतील अर्थशास्त्राचें अध्ययन-अध्यापन यांविषयींहि चर्चा करण्यांत आली. तसेंच, अर्थगणितज्ञां-( Econometricians )-नींहि कांहीं निबंध वाचून आपल्या विषयाचा परिचय सभासदांना करून दिला.

डॉ. हिरेंद्रलाल डे यांचें अध्यक्षीय भाषण यंदां बरेंच गाजलें. भारतांतील वस्तूंच्या भाववाढीचा प्रत्येक व्यक्तीला हरघडीला जाचणारा अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न, त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणासाठीं विषय म्हणून निवडलेला होता. भाववाढीवर डॉ. डे यांनीं सुचविलेली उपाययोजना ही जरा कडक स्वरूपाची असल्यानें, तिनें साहजिकच लोकांचें लक्ष आकर्षित करून घेतलें. डॉ. डे यांच्या या भाषणांतील विषयांवर व त्यांतील विधानांवर तपशीलवार चर्चा अधिवेशनांत झाली असती तर तें चांगलें झालें असतें; परंतु तसें जमूं शकलें नाहीं.

### भाववाढीचें नियंत्रण व त्याच्या मर्यादा

डॉ. डे यांनीं आपल्या भाषणाच्या पूर्वार्धांत भारतांत आजवर झालेल्या भाववाढीचा आढावा घेतला. स्वातंत्र्यसंपादनानंतरच्या कालाचाच त्यांनीं आपल्या भाषणांत प्रामुख्यानें विचार केला. या कालखंडांत वस्तूंच्या भावांवर परिणाम करण्यासारख्या घडलेल्या घटना म्हणजे नोव्हेंबर १९४७ मध्यें सरकारनें केलेलें बि-नियंत्रण ( decontrol ), त्यानंतर एक वर्षानंतर पुन्हां स्वीकारलेलें नियंत्रणाचें धोरण, रुपयाच्या भावाचें अवमूल्यन व कोरियन रणक्षेत्रावरील युद्धाची सुरवात--ह्या होत. नोव्हेंबर १९४७ मध्यें भावांचा साधारण निर्देशांक ( general index ) युद्धपूर्व कालाशीं तुलना करतां ३०२ इतका होता. बि-नियंत्रणामुळें भावांत भरमसाट वाढ होऊन हाच निर्देशांक डिसेंबर १९४८ मध्यें ३८४ इतका वर चढला. यानंतर जून १९५० पर्यंत चढत्या भावांना आपल्या काबूंत ठेवावयाच्या सरकारी प्रयत्नांस कांहींसें यश येऊन








या १८ महिन्यांच्या काळांत हा निर्देशांक केवळ १२ अंकांनींच, म्हणजे ३९६ पर्यंतच वर चढला. कोरियन युद्धाच्या सुरुवातीनंतर मात्र भाव पुन्हां कडाडूं लागले व एप्रिल १९५१ मध्यें हा निर्देशांक ४५८ पर्यंत वर चढला. भारतांतील भाववाढीनें आजवर गांठलेला हा सर्वोच्चांक होय. यानंतरच्या काळांत ऑक्टोबर १९५१ पर्यंत हा निर्देशांक सुमारें २० अंकांनीं खालीं उतरला. ही स्थिति किती कायम राहील हें आज निश्चित सांगणें कठिण आहे. किंबहुना याच गतीनें भाव उत्तरोत्तर उतरत जातील अशीहि जरी कल्पना केली, तरीहि किंमती पुरेशा खालीं उतरावयास बराच कालावधि लागेल.

हे भाव तांतडीनें खालीं कसे उतरावे हा एक आजचा महत्त्वाचा आर्थिक प्रश्न आहे. या कालखंडांत आपल्या देशांत वस्तूंच्या भावांत किती टक्के वाढ झाली याची इतर देशांत याच कालखंडांत झालेल्या भाववाढीशीं तुलना करून डॉक्टर डे यांनीं असें दाखविलें आहे कीं, भारतांत या चार वर्षांत झालेली वाढ ४६ टक्के होती, तर इंग्लंडमध्यें हीच वाढ ६८ टक्के होती व कॅनडामध्यें ४२ टक्के होती. या दृष्टीनें इतर देशांशीं तुलना करतां आपल्या देशांतील भाववाढ अगदींच गैर नव्हती, असा एक आभास निर्माण होतो. ही तुलनाच बरीचशी अप्रस्तुत, अनाहूत व अयोग्य होती असें मला वाटतें. या कालखंडाच्या सुरुवातीला डिसेंबर १९४७ मध्यें घाऊक भावांचा निर्देशांक ( index number of wholesale prices ) हा भारतांत ३१४ होता, इंग्लंडमध्यें १८७ होता, कॅनडामध्यें १७० होता. अशा स्थितींत यानंतर झालेली वाढ सर्व देशांत सारख्याच प्रमाणांत होती, असें समाधान मानणें म्हणजे घातुक आत्मवंचना करून घेण्यासारखें आहे. तें कसेंहि असलें तरी भारतांतील भाववाढीला नियंत्रण घालून भाव खालीं उतरविणें ही अत्यंत निकडीची गोष्ट आहे, असें आग्रही प्रतिपादन डॉक्टर डे यांनीं आपल्या भाषणांत केलेलें आहे. भाववाढीमुळें होणारे सर्व वाईट परिणाम मांडून, मोजकें उत्पन्न असलेल्या मध्यमवर्गावर भाववाढीचा किती वाईट परिणाम होतो, तें त्यांनीं दाखविलें आहे. या आर्थिक दुरवस्थेमुळें मध्यमवर्गांतील लोकांची नैतिक पातळीहि खालावत चालली आहे हें त्यांनीं सांगितलेलें सत्य महत्त्वाचें आहे. याखेरीज धान्याच्या किंमतींतील वाढीमुळें ज्यांना आपली मिळकत वाढवतां आली नाहीं असे धान्य विकावयास जवळ नसणारे असंख्य गरीब शेतकरी व भाववाढीच्या प्रमाणांत महागाईभत्ता न वाढल्यामुळें कुचंबणा झालेला खालचा नोकरवर्ग यांचीहि बाजू त्यांनीं योग्य प्रकारें मांडली व या सर्वांचें जीवन सुसह्य करण्यासाठीं भाव खालीं उतरविणें आवश्यक आहे, असें डॉ. डे यांनीं प्रतिपादिलें.

भाव उतरावयाचे म्हणजे किती उतरावयाचे हेंहि विचारपूर्वकच ठरवावें लागतें. युद्धपूर्व काळांतील भाव पुन्हां आपल्याला कधीं काळीं दिसतील ही अपेक्षा आपण सोडून दिली पाहिजे. आजचा निर्देशांक ३०० पर्यंत खालीं उतरविला कीं, आपण जिंकली असें समजावयास हरकत नाहीं. भाव इतके उतरविणेंहि कदाचित् आपल्या सरकारला शक्य होणार नाहीं. याहून भाव अधिक खालीं उतरविणें शक्य नाहीं, आवश्यक नाहीं व इष्टहि पण नाहीं. आज भाववाढीची लोकांना १० वर्षें संवय झालेली आहे. समाजांतील सर्व व्यवहार, देवघेवी, वेतनश्रेणी आतां या भाववाढीला रुळलेल्या आहेत. भाव एकदम खालीं उतरविले तर ही घडी पुन्हां विसकटून जाईल. भाव फार उतरत राहिले तर इतर योग्य ती काळजी न घेतल्यास नफ्याचें प्रमाण कमी होऊन उद्योगधंद्यांवर त्याचा विपरीत परिणाम व्हावयाची व बेकारींत भर पडण्याचीहि भीति असते. याखेरीज आपल्या देशांतील भाव आपण ज्या देशांशीं व्यापार करतों त्या देशांतील भावांशीं शक्य तितके जुळते असण्याची आवश्यकता असते. या दृष्टीनेंहि पाहतां ३०० हाच निर्देशांक आज तर सोईस्कर दिसतो.

### डॉ. डे यांनीं सुचविलेले उपाय

आजचे भाव या मर्यादेपर्यंत खालीं उतरविण्याच्या दृष्टीनें डॉक्टर डे यांनीं पुढील दोन उपाय सुचविले : यांपैकीं पहिला उपाय असा कीं सर्व

वस्तूंच्या भावांतच सरसहा ३० टक्क्यांची कपात जाहीर करण्यांत येऊन ती अंमलांत आणण्यांत यावी. दुसरा उपाय म्हणजे रुपयाच्या हुंडणावळीच्या दरांत १६·६६ टक्के वाढ करून तो दर २१ पेन्सांवर नेऊन ठेवावा हा होय. पहिल्या उपायानें किंमती तर खालीं येतीलच, परंतु तयार वस्तूंच्या किंमतीबरोबरच वस्तू तयार करण्यासाठीं लागणारा खर्च हाहि कमी झाल्यानें नफ्याच्या प्रमाणावर व अन्तीं उत्पादनावर त्याचा कांहीं वाईट परिणाम होणार नाहीं अशी अपेक्षा त्यांनीं व्यक्त केली. हुंडणावळीचा दर वाढविल्यानें आपल्याला आयात अधिक स्वस्त दरांत करतां येईल, आपल्या आयातीचें प्रमाण वाढेल व त्यामुळेंहि भाव खालीं उतरावयास मदत होईल असें त्यांनीं सांगितलें. भारतांतील किंमती उतरल्या म्हणजे हुंडणावळीचा दर वाढविला असतांहि आपल्या निर्यातीवर त्याचा प्रतिकूल परिणाम होणार नाहीं, निर्यात कांहीं प्रमाणांत वाढेलच व आयात-निर्यातीचा मेळ घालणें आपल्याला कठिण जाणार नाहीं अशीहि आशा त्यांनीं व्यक्त केली.

हे दोन्हीहि उपाय जितके कडक तितकेच वादग्रस्तहि आहेत. एका लहान लेखाच्या मर्यादेंत त्यांचा योग्य परामर्श घेणें अवघड आहे. रुपयाचा हुंडणावळीचा दर पुन्हां वाढवावा कीं नाहीं, वाढविला तर किती प्रमाणांत वाढवावा या गोष्टी अर्थशास्त्रज्ञांत आज वादाचा विषय होऊन बसलेल्या आहेत. या दृष्टीनें या गोष्टींचें जेवढें विवेचन व्हावयास पाहिजे होतें तेवढें डॉक्टर डे यांनीं आपल्या भाषणांत केलेलें नाहीं. सर्व किंमती सरसहा खालीं उतरविण्याचा उपाय हा प्रथमदर्शनीं सुगम वाटला, तरी तो प्रत्यक्ष व्यवहारांत अंमलांत आणणें हें अत्यंत अवघड आहे. अनेक वस्तूंच्या भावांचें असें यशस्वी नियंत्रण आपल्या सरकारला करणें कितपत शक्य होईल याविषयीं साहजिकच मनांत शंका उभी राहते. कोणत्याहि महत्त्वाच्या एक-दोन वस्तूंचे भाव काबूंतून सुटले, तर इतर वस्तूंचें भावनियंत्रण करारीपणें चालू ठेवणें अवघड, किंबहुना अशक्यप्राय झाल्याखेरीज राहणार नाहीं. या कामीं सामान्य जनतेची सहानुभूति आणि जागरूक मदत सरकारला उपयोगी पडतील अशी डॉक्टर डे यांना आशा वाटते. परंतु हा अर्थशास्त्रज्ञांच्या कक्षेबाहेरील विचार झाला.

### पंचवार्षिक योजनेमागील मर्यादा

आज भारतांत आपली एकूण परिस्थितीच इतकी गुंतागुंतीची आणि विचित्र झालेली आहे कीं, इतर राजकीय, सामाजिक इत्यादि क्षेत्रांत काय घडेल व काय घडावें याचा विचार केल्याखेरीज आर्थिक प्रश्नांचा विचार करणें हें खरोखरच अवघड होऊन बसलेलें आहे. अशा परिस्थितींत अर्थशास्त्रज्ञांनीं आपल्या कार्यक्षेत्राच्या मर्यादा ओळखणें हेंच चांगलें. आपल्या कार्यक्षेत्राच्या बाहेर अर्थशास्त्रज्ञानें दिलेलें मत व एखाद्या सुबुद्ध नागरिकानें दिलेलें मत या दोहोंचें महत्त्व सारखेंच. ही गोष्ट लक्षांत न राहिल्यामुळें भारतांत पंचवार्षिक योजनेचा आराखडा प्रसिद्ध झाल्यानंतर जी चर्चा झाली ती पुष्कळशी अनाठायीं अशीच होती. सरकारनें समाजवादाचें ध्येय स्वीकारावें कीं नाहीं, भांडवलदारांना डावलून अर्थसत्ता आपल्या हातीं घ्यावी कीं नाहीं, हा खरोखरी सरकारच्या राजकीय सामर्थ्याचा प्रश्न आहे. या बाबतींत अधिकारारूढ राजकीय पक्षाला आपल्या कर्तृत्वावर ज्या व्यावहारिक मर्यादा पडतात असें वाटत असेल, त्या मर्यादांच्या परिघांतच त्यानें केलेली नियोजनाची आंखणी सुसूत्र आहे कीं नाहीं, हें पाहणें हेंच अर्थशास्त्रज्ञांचें अर्थशास्त्रज्ञ या नात्यानें खरोखरीचें काम आहे. अधिवेशनांत पंचवार्षिक योजनेच्या आराखड्यावर जी चर्चा करण्यांत आली ती या भूमिकेवरूनच करण्यांत आली ही समाधानाची गोष्ट होय.

या चर्चेत डॉ. व्ही. के. आर. व्ही. राव, प्रा. सी. एन्. वकील प्रभृतींनीं भाग घेतला. सरकारच्या नियोजन-समितीचे अर्थशास्त्रज्ञ सल्लागार प्राध्यापक अंजारिया हे या अधिवेशनास उपस्थित होते. पंचवार्षिक योजनेवर घेण्यांत आलेल्या आक्षेपांना उत्तरें देऊन योजनासमितीची भूमिका त्यांनीं विशद केली. वर सांगितल्याप्रमाणें कांहीं विशिष्ट मर्यादा मान्य केल्यानंतर आपली पंचवार्षिक योजना आजच्या स्वरूपांत पुढें मांडणें बरेंचसें








अपरिहार्य होतें असाच चर्चेतून सूर निघाला. आपल्याला बहुतेक सगळीच तयारी आज मुळापासून करावयाची आहे. पुष्कळशा बाबतींतील निश्चित आंकडे देखील आज आपणांजवळ उपलब्ध नाहींत.

याखेरीज नियोजनसमितीनें आंखलेली योजना ही कांहींशी पूर्वक्रमानुसार आधीं घडत आलेलीच होती. यापूर्वीच कांहीं दीर्घ मुदतीच्या योजना मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें यांनीं हातीं घेतलेल्या होत्या. तात्त्विक महत्त्वमापनाच्या दृष्टीनें त्या अर्धवट सोडून देणें शक्य नव्हतें. अशा परिस्थितींत आपल्या हातीं असलेल्या मर्यादित साधनांचा शक्य तितका चांगला उपयोग करून घेणें हेंच नियोजनसमितीला शक्य होतें व तें तिनें केलें कीं नाहीं हाच काय तो वादाचा मुख्य विषय होऊं शकतो. या भूमिकेवरूनहि पंचवार्षिक योजनेवर प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनीं घेतलेले आक्षेप महाराष्ट्रीयांस तरी सुपरिचित आहेत. प्रा. धनंजयराव गाडगीळ यांची परिषदेंतील अनुपस्थिति या चर्चेच्या वेळीं अधिवेशनाला विशेष जाणवल्याखेरीज राहिली नाहीं.

ज्या मर्यादांच्या आंत आपल्या पंचवार्षिक योजनेची आंखणी झालेली आहे त्या मर्यादा अशा सांगतां येतील : ( १ ) पुढील पांच वर्षें तरी लोकसंख्येची वाढ चालू प्रमाणांतच पुढें होत राहील असें आपल्याला गृहीत धरून चाललें पाहिजे. लोकसंख्येच्या बाबतींतील आपली समस्या खरो-खरींच बिकट आहे. लोकसंख्येची वाढ थांबविण्या-च्या मार्गांत आर्थिक, सामाजिक, धार्मिक, राज-कीय अशा सर्व अडचणी आपल्यासमोर उभ्या आहेत. सामाजिक व धार्मिक प्रतिकूलतेमुळें राजकीय पक्ष या प्रश्नाला हात घालावयास बिचक-तात. आर्थिक राहणीचें मान जसजसें वाढत जातें तसतसा माणूस साहजिकच संततिनियमनाकडे व कुटुंबनियोजनाकडे वळतो, असा इतर देशांतील अनुभव आहे. आज आपल्या देशांतील बहुसंख्य जनतेला म्हणण्यासारखें राहणीचें मानच नाहीं व त्यामुळें राहणीचें मान टिकवून धरण्याच्या वा वाढविण्याच्या ईर्ष्येतून निर्माण होणारी कुटुंब-नियोजनाची इच्छाहि जनतेच्या ठिकाणीं नाहीं. लोकसंख्येंत वाढ झाल्यामुळें राहणीच्या मानांत वाढ होत नाहीं व राहणीच्या मानात वाढ न झाल्यामुळें, लोकसंख्येच्या वाढीला साहजिक असा आळा बसूं शकत नाहीं, असें कांहींसें दुश्चक्र निर्माण झालेलें आहे. या दुश्चक्रांत आशियांतील अनेक राष्ट्रें सांपडलेलीं आहेत. आर्थिक उत्पादन झपाट्यानें वाढविणें हाच या दुश्चक्रांतून सुटका होण्याचा एक उपाय आहे. तें आपल्याला कितपत साध्य करतां येतें यावरच आपल्या यापुढील सर्व आर्थिक योजनांचें यशोमापन करावें लागेल. ( २ ) उत्पादनासाठीं लागणारें अंतर्गत भांडवल उभें करण्यासाठीं आपण भारतीय भांडवलदारांची मदत घेणार आहोंत. मध्यम व गरीब वर्गांतील लोकहि लहान-लहान बचती करून कांहीं भांडवल गोळा करूं शकतील. परंतु भारतांतील बहुसंख्य जनतेला अजूनहि पैसा बँकेंत ठेवण्यापेक्षां किंवा उद्योग-व्यापारांत गुंतविण्यापेक्षां, रोकड किंवा सोनें या स्वरूपांत आपल्याजवळ ठेवणें किंवा जमीन-खरेदींत उपयोगी आणणें अधिक आवडतें. भांडवलदारांकडे भांडवल सांठावें व त्याचा उत्पादनकार्यांत उपयोग व्हावा अशी इच्छा अस-ल्यास भांडवलदारांना सवलती देणें क्रमप्राप्तच आहे. या दृष्टीनें भांडवलदारांवरील कराची कमाल मर्यादा आज गांठली गेली आहे व यापुढें सरकारचें कराचें उत्पन्न वाढवावयाचें असल्यास तें अप्रत्यक्ष करांच्या रूपानें सामान्य जनतेकडून कर वसूल करून वाढ-विलें पाहिजे, हीहि गोष्ट अपरिहार्यपणें क्रमप्राप्त होतें. सरकारच्या अंदाजपत्रकी धोरणांत अप्रत्यक्ष करांना यापुढें वाढतें महत्त्व राहील हा विचार अधिवेशना-पुढें मांडण्यांत आला व तो अनेकांना पटला. अर्थव्यवस्था भांडवलदारांच्या हातून ज्यांना पूर्णपणें काढूनच घ्यावयाची असेल त्यांची गोष्ट वेगळी. परंतु भारतांतील प्रत्यक्ष राजकारणाच्या दृष्टीनें आज ही मर्यादा आपण मान्य करावयास पाहिजे. ( ३ ) आपला आर्थिक विकास झपाट्यानें साधावयाचा असेल तर परकीय मदतीची आपल्याला अत्यंत आवश्यकता आहे. ही मदत भांडवलाच्या स्वरूपाची आणि तन्त्रज्ञानाच्या स्वरूपाचीहि हवी आहे,








तरी पण या मदतीच्या मागें असणारे अमेरिकेचे राजकारणाचे धागे आज सर्वांना माहीत आहेत. तेव्हां आजच्या राजकीय परिस्थितींत परकीय भांडवलदारांकडून किंवा परकीय सरकार-कडून ही मदत मोठ्या प्रमाणावर मिळूं शकेल अशी अपेक्षा आपण बाळगूं नये हेंच चांगलें. नियोजन-समितीनेंहि ही मर्यादा सांभाळली आहे. ( ४ ) अन्न-धान्य व यंत्रसामग्री यांच्या आयाती-साठीं तरी परदेशी चलन आपल्याजवळ असणें आवश्यक आहे. आपल्या स्टर्लिंग गंगाजळीचा उपयोग आपण या कामासाठीं आजवर करीत आलों आहोंत. परंतु आतां ती अर्थातच आटत आली आहे. अन्न-धान्याच्या आयातीवर असा खर्च करणें म्हणजे आपल्या गंगाजळीचा, परदेशी चलना-चा अपव्यय करण्यासारखेंच आहे. यामुळेंच अन्न-धान्यांत स्वयंपूर्ण होणें हें आपलें तांतडीचें ध्येय बनतें. कृषितन्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, सरकार, व प्रत्यक्ष शेतकरी यांच्या नेतृत्वावर व कर्तृत्वावरच हा प्रश्न यशस्वीपणें सुटणें अवलंबून आहे. आशावादीपणानें योजनेला सुरुवात करणें एवढेंच नियोजकांना आज शक्य आहे.

वरील मर्यादा पाहिल्या कीं, आपल्या आर्थिक भवितव्याविषयीं मनांत साशंकता निर्माण होते. परंतु यांत नियोजकांचा दोष नाहीं, आपल्या आजच्या एकूण परिस्थितीचाच तो परिणाम आहे.

भारतांतील जमीनधारा-पद्धति व तिच्या सुधारणा आणि भारतांतील अर्थसत्तेचें केन्द्रीकरण हे प्रश्नहि दोन बैठकींतून चर्चिण्यांत आले. जमीन-धारा पद्धतीविषयीं बरीचशी चर्चा आजवर इतरत्रहि झालेली आहे. या अधिवेशनांत कांहीं अभ्यासकांनीं आपल्या निबंधांतून आपापल्या प्रादेशिक विभागांत असणाऱ्या जमीनधारा-पद्धतींची अधिक तपशील-वार अशी माहिती पुरविली इतकेंच. याखेरीज त्या विषयावरील आजवर झालेल्या विचारांत या चर्चेतून कांहीं विशेष अशी नवी भर पडली, असें म्हणतां येणार नाहीं.

### अर्थसत्तेचें केन्द्रीकरण

भारतांतील अर्थसत्तेचें केंद्रीकरण हा एक प्रथम-दर्शनीं आकर्षक असा विषय होता. भांडवलदारांच्या हातीं कोणत्या पद्धतीनें अर्थसत्ता केंद्रीभूत होत आहे व त्याचे राजकीय, आर्थिक व सामाजिक दुष्परिणाम कसे व कोणते होत आहेत याची पाहाणी होणें हें जितकें मनोरंजक तितकेंच महत्त्वाचेंहि पण आहे. परंतु या विषयावर निबंध लिहिणाऱ्या अभ्यासकांना या विषयाच्या अभ्यासांत प्रत्यक्ष येणाऱ्या व्यावहारिक अडचणी जाणवल्याखेरीज राहिल्या नाहींत. कारण या विषयाच्या पूर्ण अभ्यासासाठीं लागणारी निरनिराळी माहिती आपल्याकडे योग्य त्या स्वरूपांत उपलब्ध नाहीं. आपल्याप्रमाणेंच इतर राष्ट्रांनाहि या विषयाचा अभ्यास करतांना ही अडचण जाणवलेलीच आहे. सरकारनें पुरस्कृत केलेल्या किंवा सरकारनें प्रत्यक्ष स्वतःच हातीं घेतलेल्या पाहाणींतच अशी माहिती भांडवलदारांकडून उपलब्ध होणें शक्य असतें. सरकारला माहिती पुरवितांनाहि भांडवलदार अनेक पळवाटा शोधतात, अर्धसत्यें सांगतात असा अमेरिकेंतील अनुभव आहे. या पाहाणीचें कार्य सरकारी प्रेरणेनेंच व्हावयास पाहिजे. खासगी व्यक्तींचे वा खासगी संशोधन-संस्थांचे प्रयत्न एका विशिष्ट मर्यादेपलीकडे फलप्रद होऊं शकणार नाहींत, याची जाणीव अधिवेशनाला या चर्चेनें करून दिली.

भारतांत अर्थसत्तेच्या केंद्रीकरणामुळें उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांचा तीन विभागांत विचार करतां येईल : ( १ ) प्रगत राष्ट्रांतील प्रश्नांशीं सदृश असे प्रश्न. ( २ ) अप्रगत राष्ट्रांतील प्रश्नांशीं सदृश असे प्रश्न व ( ३ ) खास भारताचे विशेष असे प्रश्न. पहिल्या विभागांत उद्योगधंदे, व्यापार, बँक्स् व विमा-संस्था यांतून अर्थसत्तेचें केन्द्रीकरण कोणत्या मार्गानें करण्यांत येतें व त्याचे आर्थिक, राजकीय व इतर परिणाम काय होतात या प्रश्नांचा विचार होतो. सर्व प्रगत राष्ट्रांना या प्रश्नांचा विचार करणें भाग पडलें आहे. अमेरिके-सारख्या राष्ट्राशीं तुलना करतां आपले मोठमोठे उद्योगधंदे देखील लहान वाटूं लागतात. परंतु आपल्या प्रश्नाचें आकारप्रमाण बदललें, तरी स्वरूप मात्र तेंच कायम राहतें. दुसऱ्या विभागांतील प्रश्नांत परकीय भांडवलदारांच्या हातांत झालेलें अर्थसत्तेचें केन्द्रीकरण, केवळ सट्टेबाजी व व्यापार यांवर संतुष्ट







असणाऱ्या लोकांच्या हातीं एकवटलेली अर्थसत्ता, देशाच्या निरनिराळ्या प्रादेशिक विभागांतून आढळून येणारी अर्थसत्तेची अत्यंत विषम विभागणी, राजेमहाराजे, जमीनदार या लोकांच्या हातीं असलेली संपत्ति व त्यामुळें उद्योग-व्यापारांत भांडवल गुंतवून या लोकांनीं यापुढें अर्थसत्ता आपल्या हातीं घेण्याचा संभव—अशा प्रकारच्या प्रश्नांचा समावेश होतो. तिसऱ्या विभागांत भारताचे दोन विशेष सांगतां येतील. आपल्या देशांत अर्थसत्तेचें केन्द्रीकरण कांहीं विशिष्ट जाती जमातींच्याच हातीं झालेलें आहे हा पहिला विशेष होय. त्याचप्रमाणें एकूण भांडवलदारांविषयीं व या अर्थसत्तेच्या केन्द्रीकरणाविषयीं कोणतें धोरण स्वीकारावें याविषयीं सरकारच्या विचारांत, उच्चारांत व कृतींत आढळून येणारी अनिश्चितता हा दुसरा विशेष म्हणून सांगतां येईल. या प्रत्येक प्रश्न-उपप्रश्नाचा नीट अधिकृत अभ्यास होणें आवश्यक आहे.

**अर्थशास्त्राचें अध्ययन-अध्यापन**

याखेरीज या अधिवेशनांत चर्चिला गेलेला विषय म्हणजे अर्थशास्त्राचें भारतांतील अध्ययन-अध्यापन हा होय. आज भारतांत सर्वच क्षेत्रांत आपल्या सद्यःस्थितीविषयीं जें असमाधान दिसून येतें तेंच या चर्चेच्या वेळीं निदर्शनास आलें. असें असमाधान विधायक वृत्तीनें कार्यकारी झालें, तरच त्यांतून नवनिर्मितीची खरोखर कांहीं आशा असते. या चर्चेत मांडण्यांत आलेले बरेचसे मुद्दे राधाकृष्णन्-समितीनें भारतीय विद्यापीठांसंबंधीं लिहिलेल्या आपल्या अहवालांत विचारांत घेतलेले आहेत. अधिवेशनांत या गोष्टींचा विचार अर्थशास्त्रज्ञांच्या कांहीं विशेष परिस्थितीच्या अनुरोधानें झाला, इतकेंच. आजच्या भारतांत एका महत्त्वाच्या शाखेचे तंत्रज्ञ म्हणून अर्थशास्त्रज्ञांना महत्त्वाचें कार्य करावयाचें आहे. आपलीं अर्थशास्त्रांतील अध्ययन, अध्यापन व संशोधन हीं तिन्हींहि या दृष्टीनें तोकडीं पडत आहेत. ही परिस्थिति सुधारावयाची असेल तर प्राध्यापकांचा सामाजिक व आर्थिक दर्जा वाढवावयाला पाहिजे; त्यांच्यावरील व्याख्यानांचा बोजा कमी करून संशोधनकार्याकडे लक्ष पुरविण्यास त्यांना अधिक अवसर दिला पाहिजे. सरकारनें अभ्यासाच्या अधिक सोयी उपलब्ध करून द्यावयास पाहिजेत व अर्थशास्त्रज्ञांचें चालू जमान्यांतील महत्त्व ओळखून आपल्या वरिष्ठ नोकरवर्गात अर्थशास्त्रज्ञांचा समावेश करून घेतला पाहिजे, किंबहुना अशी अर्थशास्त्रज्ञांची एक वेगळी तज्ज्ञशाखाच सरकारनें आपल्या मदतीसाठीं तयार करणें आवश्यक आहे असा या चर्चेचा सूर होता. या सर्व गोष्टी महत्त्वाच्या तर आहेतच, परंतु त्याबरोबरच अर्थशास्त्राच्या अभ्यासकांनींहि अधिक जागरूकपणें आपापल्या शाखेंत पारंगतता मिळविण्यासाठीं प्रयत्न केले पाहिजेत, असें कोणी सांगितलें असतें तर बरें झालें असतें. परंतु अभ्यासकांच्या मेळाव्यापुढें असें विधान करणें कोणाला आवश्यक वा इष्ट वाटलें नसावें !

**अर्थगणित ( Econometrics )**

अर्थगणिताचाहि कांहींसा परिचय या अधिवेशनांत सभासदांना करून देण्यांत आला. अर्थगणित ही एक नवीनच वाढीला लागलेली अर्थशास्त्राची एक शाखा आहे. या शाखेंत अर्थशास्त्र, गणित व संख्याशास्त्र या तिहींचाहि समावेश होतो. गणितांच्या पद्धतींचा उपयोग करून अर्थशास्त्रीय सिद्धांतांची विवेचन करण्याची रीत अनेक पाश्चात्य अर्थशास्त्रज्ञ वापरीत असतात. केवळ विषयाच्या अभ्यासाच्या दृष्टीनें गणिताचें ज्ञान अर्थशास्त्रज्ञाला अगदीं आवश्यकच आहे असें फारसें कोणी मानीत नाहीं. परंतु गणिती पद्धतीनें विचारांना अधिक निश्चितता येते; विवेचनांत चुकून कांहीं त्रुटी राहिलेल्या असल्यास त्या लक्षांत येण्याचा अधिक संभव असतो; प्रश्नाच्या उत्तरांचे अनेक पर्याय सुलभपणें लक्षांत येऊं शकतात, येवढें मात्र खरें. या दृष्टीनें व संख्याशास्त्राचाहि सहजपणें उपयोग करतां यावा म्हणून अर्थ-गणिताचा अभ्यास अर्थशास्त्राच्या अभ्यासकांनीं करणें आवश्यक आहे.

आजकालच्या अधिवेशनाच्या एकूण पद्धतीप्रमाणें अधिवेशन यशस्वी झालें असलें तरी अधिवेशनापुढें येणारे निबंध अधिक स्वतंत्रसंशोधनपर असावेत व अधिवेशनानें अखिलभारतीय व्यापाचें एखादें संशोधनकार्य हातीं घ्यावें असें अनेक तरुण उत्साही सदस्यांना वाटतें.








बी-कवींच्या ‘ पिंगा ’ व कवितेच्या निमित्तानें विवेचन : प्रा. ह. श्री. शेणोलीकर

# ज्ञानेश्वरीय परंपरेंतील बी (‘*Bee*’) कवि

अर्वाचीन मराठींतील कविमालिकेंत बी कवींना केशवसुत गोविंदाग्रजादि संप्रदायांव्यतिरिक्त असें स्वतंत्र स्थान आहे, ही गोष्ट काव्यचिकित्सकांनीं आतां मान्य केली आहे. त्यांचें वैशिष्ट्य वस्तुनिष्ठ दृष्टीच्या व तात्त्विक स्वरूपाच्या काव्यरचनेंत आहे, असेंहि टीकाकारांनीं सांगून टाकलें आहे. मात्र या पृथगात्मकतेची विशेष फोड करण्याच्या भरीस कोणी पडलेलें दिसत नाहीं. अगोदरच बी कवींच्या काव्या-वर चिकित्सापूर्वक लिहिले गेलेले असे टीकालेख हाताच्या बोटांदरच मोजावे लागतील, इतके थोडे आहेत. त्यांतहि त्यांच्या प्रमुख कवितांचा परिचय व काव्यगुणांची ओळख करून देण्यावरच विशेष भर दिसतो. ‘ बी हे नुसते Poet नसून Poet and Philosopher आहेत ’[1]; त्यांच्या कवितेंत तत्त्वप्रवणता व ‘ उदात्त विचारांचे आकर्षण आहे, बी कवींना आपल्या जुन्या तत्त्वज्ञानाचा चांगला परिचय होता असें दिसतें ’[2]; किंवा ‘ बींनीं मराठी काव्यांत तात्त्विक काव्याची मुहूर्तमेढ रोविली ’ [3] अशा तऱ्हेचे निष्कर्ष काढण्यापलीकडे या टीकाकारांनीं बींच्या तत्त्वज्ञानाचा विशेष साक्षेपानें परामर्श घेतलेला दिसत नाहीं.

वास्तविक ‘फुलांची ओंजळ’, ‘ पूर्ण कीं अपूर्ण ’, ‘ चांफा ’, ‘ पिंगा ’ यांसारख्या कवि-तांचा परिचय करून देतांना त्या कवितांच्या आशयासंबंधीं कांहीं सांगावयाचें म्हटलें, तर त्यांतल्या तात्त्विक दृष्टिकोनाकडेच वळणें क्रमप्राप्त आहे. पण ह्या कवितांच्या बाबतींतहि ‘ पद्यपंक्तींचा गद्यार्थ ’ उतरविण्याशिवाय अधिक खोलांत जाण्याची यातायात टीकाकारांनीं केलेली दिसत नाहीं.[4] तत्त्वज्ञ कवि म्हणून मान्यता पावलेल्या बींच्या तत्त्वज्ञानाचा, जीवनविषयक दृष्टिकोनाचा मूळ गाभा उकलण्याचा कोणींच प्रयत्न केला नाहीं असें म्हटलें, तर पूर्वटीकाकारांवर [5] मोठा अन्याय होईल, असें वाटत नाहीं. बींच्या तत्त्वज्ञानाचा मूळ गाभा समजून घेण्याची गुरुकिल्ली म्हणजे त्यांची ‘ पिंगा ’ ही कविता होय. या कवितेच्या आधारा-नेंच बींच्या तत्त्वज्ञानाची ओळख करून घेण्याचा प्रयत्न करूं या.

## ‘ पिंगा ’ गूढगुंजनपर नाहीं

‘ पिंगा ’ ही कविता टीकाकारांच्या मता-प्रमाणें गूढगुंजनपर कवितांच्या वर्गांतील आहे. म्हणूनच ‘ अर्थनिष्पत्तीला कठिण, गूढ, क्लिष्ट ’ अशी टीका[6] या कवितेवर करण्यांत आली

---

१. ‘ फुलांची ओंजळ ’, प्रस्तावना, पान १५–( प्र. के. अत्रे )
२. ‘ अर्वाचीन मराठी काव्य ’, पान १०७–( रा. श्री. जोग )
३. ‘ सह्याद्रि ’ ( जानेवारी १९३६ )—अ. गं. मंगरूळकर
४. ‘ फुलांची ओंजळ ’, प्रस्तावना व विचारसमीक्षा ( वा. ना. देशपांडे ) पाहा.
५. नागपूरच्या ‘ युगवाणी ’ मासिकाचा खास ‘ बी ’ अंक पाहावयास मिळाला नाहीं.
६. ‘ फुलांची ओंजळ ’—प्रस्तावना, पान ४०








आहे. परंतु ही कविता गूढगुंजनपर नसून उघड उघड तात्त्विक स्वरूपाची आहे. तात्त्विक विचार व त्याचा कलात्मक आविष्कार या दोन्ही दृष्टींनीं ' पिंगा ' ही कविता ' झपूर्झा ' पेक्षां अधिक सुसंगत आहे, एका विशिष्ट तत्त्वज्ञानाला धरून आहे. त्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीतून कविता वाचूं लागलों कीं, अर्थनिष्पत्ति सुगम होते व त्यांतील गूढताहि निघून जाते. त्यामुळें ' कलगीचें गाणें ' या कवितेच्या पंक्तीला ' पिंगा ' बसवून प्रस्तावनाकारांनीं बींवर खरोखरच अन्याय केला आहे. ' वेदान्त-विषयांतील क्लिष्ट परिभाषा व गूढ कल्पना यांची वृत्तबद्ध गुंतावळ ' हें रा. अत्रे यांनीं केलेलें वर्णन गडकऱ्यांच्या उपर्युक्त कवितेला लागूं पडणारें असलें तरी बींच्या या कवितेला तें लागूं पडत नाहीं हें खास ! ' माझा पिंगा गोड गडे ! ' किंवा ' नाचण मी मुळची मोठी ' यांतील प्रथम पुरुषी सर्वनामाचाच आधार कोण हें तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें एकदां निश्चित केलें कीं या कवितेंत गूढ अगर क्लिष्ट असें कांहींच उरत नाहीं.

### बींची आध्यात्मिक भूमिका संतकवींचीच

बींचा आध्यात्मिक तत्त्वज्ञानाचा व संतवाङ्मयाचा चांगला अभ्यास होता असें सांगतात. त्यांच्या कवितेवरूनहि तें स्पष्ट होतें. ज्ञानेश्वरादिकांच्या प्राकृत काव्यांतून का होईना, पण ज्यांचा आपल्याकडील आध्यात्मिक तत्त्वज्ञानाशीं परिचय झाला आहे, त्यांना ' पिंगा ' कवितेंतील शब्द, कल्पना, विचार इत्यादि गोष्टी अगदीं ओळखीच्या वाटतील. कारण ज्ञानेश्वरादि संतांची जी पूर्णाद्वैती भूमिका होती, तीच आध्यात्मिक भूमिका पिंगाकारांची आहे. माझ्या मतानें बींच्या तत्त्वज्ञानावर ज्ञानेशांच्या जीवनविषयक दृष्टिकोनाची, चिद्विलासवादी भूमिकेची स्पष्ट छाप पडलेली आहे. ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाशीं उत्कृष्ट परिचय असलेल्या अभ्यासकानें त्यांच्याच परिभाषेचा—शब्दांचा, कल्पनांचा, उपयोग करून जगाकडे पाहण्याचा ज्ञानेश्वरीय दृष्टिकोन ' पिंगा ' या कवितेंत मांडला आहे. काव्यदृष्ट्याहि तो विचार आकर्षक उतरला आहे. मुळांत विश्व व विश्वात्मा यांच्यांतील एकात्मतेची चिद्विलासवादी कल्पनाच मोठी हृदयंगम, सरस नि सुबोध असल्यानें या कवितेंतील मध्यवर्ती कल्पनाहि सुगम व हृदयंगम झाली आहे. पंडितांच्या घटपटादि पद्धतीनें तत्त्वज्ञान सांगण्याचा मार्ग सोडून काव्यमय व्यक्तित्वाच्या ज्ञानेशांनीं आपलें तत्त्वज्ञान ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व चांगदेवपासष्टी यांसारख्या रसाळ नि कल्पनाप्रधान काव्यग्रंथांच्या द्वारां लोकांपुढें ठेवलें. तोच मार्ग बींनीं अनुसरलेला दिसतो. त्यांच्या चार-सहा कविता वगळल्यास बाकीच्या सर्व कवितांत तत्त्वज्ञान व काव्य यांचा मनोहर संगम आपल्या दृष्टीस पडतो. या विधानामुळें बींना ज्ञानेशांच्या बरोबरीचें पद मी देत आहे, असा गैरसमज मात्र करून घेऊं नये. फक्त या दृष्टीनें बी हे ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतील आहेत, एवढेंच मला म्हणावयाचें आहे. स्वतः बी देखील ' बंडवाल्या [७] ज्ञानेशांची थोरवी सांगणाऱ्या ' आपल्या ' डंका ' कवितेंतील—'आम्ही त्या दिलजानाचे । साथी—ना मेलेल्यांचे ' या उद्गारांनीं आपली ज्ञानेश्वरीय परंपराच घोषित करीत आहेत.

### ज्ञानेश्वरांचा चिद्विलासवाद

ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानाचें सार एका ओवींत सांगावयाचें असेल, तर अमृतानुभवांतील ' द्वैत दशेचें आंगण । अद्वैत वोळगे आपण । भेद तंव तंव दुण । अभेदाशी ॥ ' प्र. (९-२८) ही ओवी पुढें करावी लागेल. ज्ञानेशांच्या चिद्विलासवादी दृष्टिकोनाची ही एकसूत्रात्मक मांडणीच होय. विश्वांतील सर्व चराचर वस्तुजात म्हणजे चिच्छक्तीचा विलास होय, असें हा दृष्टिकोन सांगतो. त्यामुळें ' सृष्टींतील नानाविधत्व हें मायाकार्य, अतएव त्याज्य आहे ' असें शंकराचार्यांप्रमाणें ज्ञानेशांना म्हणावें लागलेलें नाहीं. उलट—' अहो ऐक्याचें मुदल न टळे । आणि साजिरेपणाचा लाभ मिळे ॥ तरी स्वतरंगाचीं मुकुळें । तुरंबू का पाणी ॥ ' (अमृ० प्र. १-५९) (एकत्वांत बिघाड न आणतां

७. " या बड्या बंडवाल्यांत 'ज्ञानेश्वर' मानें पहिला "–' फुलांची ओंजळ '–' डंका ' (पान ४८).








विविधतेचें सौन्दर्य अनुभवतां येत असेल तर पाणी तरंगरूपी फुलें धारण करेना का ? ' ) यासारख्या दृष्टान्तांतूनहि नानाविधपणांत एकाच चित्-तत्त्वाचें अस्तित्व आहे व नानात्व ही त्याचीच क्रिया आहे असा सिद्धान्त ते मांडतात. अशा रीतीनें सृष्टींतील नामरूपात्मक द्वैत पत्करूनहि अद्वैत अबाधित राहतें हेंच ज्ञानेशांनीं ठिकठिकाणीं सांगितलें आहे. महाराष्ट्रांतला भागवतधर्म याच दृष्टीनें जगाकडे, जगांतील सर्व प्रकारच्या व्यवहाराकडे पाहतो. म्हणूनच प्रवृत्ति-निवृत्तींचा योग्य समन्वय करणारा परमार्थ-सिद्धीचा यशस्वी मार्ग भागवतधर्मच सांसारिकांना दाखवूं शकला. ' अवघाचि संसार सुखाचा करीन '–( कान्होपात्रा ), ' प्रपंच जाला ब्रह्मरूप । ' –( एकनाथ ) आणि ' कांदा मुळा भाजी । अवघी विठाई माझी '–( सांवता ) यांसारख्या संत-मंडळींच्या प्रवृत्तिपर उद्‌गारांचें मूळ ज्ञानेशांच्या चिद्विलासवादी दृष्टिकोनांतच आहे. आणि याच दृष्टिकोनाचें सार ज्ञानेशांनीं 'द्वैत दशेचें आंगण।...' या अमृतानुभवांतील वरील ओवींत सिद्धान्तरूपानें सांगून टाकलें आहे.

बींनीं देखील 'पिंगा' कवितेच्या प्रारंभींच्या दोन ओळींत वरील महत्त्वाच्या ओवींतलाच आशय ग्रथित केला आहे :

> ' माझा पिंगा गोड गडे !
> अद्वयरंगीं रंग चढे. '

अद्वयरंगामध्यें म्हणजेच अद्वैतबोधामध्यें भर टाकणारा हा पिंगा म्हणजे चिद्विलासात्मक विश्व-व्यवहारच होय. कवीनें या काव्याबद्दल केलेल्या खुलाश्यावरून[८] कवीला हीच दृष्टि अभिप्रेत दिसते.

**' पिंगा ' चें खास वैशिष्ट्य कोणतें ?**

'पिंगा' म्हणजे द्वैताचें भान किंवा नानाविध नामरूपांची ही सृष्टीच होय. पण हा द्वैतभाव किंवा विश्वव्यवहार म्हणजे तरी काय, तर 'अहं'च्या जाणिवेचा खेळ होय, जाणिवेच्या शलाका ज्या कल्पना किंवा वृत्ती त्यांचा विलासच होय. त्या विलासाचें वर्णन हा या कवितेचा वर्ण्य विषय होय. विश्वाच्या घडामोडींमध्यें दंग झालेल्या मूलतत्त्वाच्या जाणिवेचा विलास वर्णन करण्याला नर्तनाखेरीज दुसरी कोठली क्रीडा उपयोगी पडणार ? म्हणून या कवितेंत प्रामुख्यानें नर्तनाचें वातावरण कवीनें रेखाटलें आहे. धुंद किंवा बेभान करून सोडणारा महाराष्ट्रीय स्त्रियांमधला देशी ( गांवठी ) नृत्यप्रकार कोणता ?- तर तो 'पिंगा' हा खेळ होय. त्या खेळाचेंच नांव या तऱ्हेच्या कवितेला अगदीं समर्पक ठरेल, असें वाटूनच बींनीं ' पिंगा ' या शब्दाची निवड केली असावी. पिंगा शब्दाला झपूर्झाप्रमाणेंच वैचित्र्य किंवा वैलक्षण्याचें आकर्षणहि आहे, हा विचारहि या शब्दयोजनेमागें असण्याचा संभव आहे.

या नर्तनाचें वर्णन अगदीं चित्रोपम ( picturesque ) असें उतरलें आहे. नर्तनाला साजेसा ठेका किंवा लयबद्धताहि छंद-योजनेंत कवीनें साधली आहे. त्यामुळें तात्त्विक दृष्ट्या प्रत्येक ओळीचा स्पष्ट अर्थबोध झाला नाहीं, तरी मूळ कल्पना समजून घेऊन कविता वाचीत गेलें कीं, कवितेचा भावार्थ सहज लक्षांत येतो आणि अद्वैतबोधाचा भावनात्मक ठसा रसिकाच्या चित्तवृत्तींवर खास उमटतो, यांत शंका नाहीं. त्या अर्थानें या कवितेचें काव्यात्मक यश वरच्या दर्जाचें आहे हें खास ! पण या तऱ्हेचें काव्यात्मक यश केशवसुतांच्या ' झपूर्झा ' व ' हरपलें श्रेय ' या कवितांनींहि मिळविलेलें आहे. बींच्या 'पिंगा' कवितेचें खास वैशिष्ट्य या तऱ्हेच्या भावनात्मक परिणामांत किंवा काव्यात्मक यशांत नसून, सुस्पष्ट तत्त्वज्ञानांत व त्याच्या सुसंगत आविष्कारांत आहे. मात्र रूढ कल्पनेप्रमाणें प्रकृतीच्या कर्तृत्वाचें वर्णन या दृष्टीनें या कवितेकडे पाहतां कामा नये. कवितेंतील सर्वनामात्मक उल्लेखाच्या ठिकाणीं 'सांख्यांची प्रकृति' किंवा 'वेदान्त्यांची माया, ' हीं

---

८ " ह्या कवितेंत 'अहं' या शुद्ध जाणिवेचा आणि कल्पनेच्या अनंत वृत्तींचा खेळ आहे. शुद्ध ' अहं '–स्फुरण तें ' मी ' आणि विकृत अहंभाव म्हणजे देहभाव किंवा द्वैताचें भान हा पिंगा अशी कल्पना या काव्यांत केलेली आहे. "—( प्रस्तावना पान ३९ )








विशेषनामें धरून वाक्यार्थ लावणें बींच्या तात्त्विक भूमिकेप्रमाणें युक्त ठरत नाहीं. आणि तसा तो लागतहि नाहीं. त्या ठिकाणीं ज्ञानेश्वरीय परिभाषेचाच ' मागोवा ' घेणें सयुक्तिक ठरेल.

या कवितेचा अर्थ विशद करतांना शब्द, कल्पना, विचार, आविष्कारपद्धति या बाबतींत ज्ञानेश्वरांच्या शैलीशीं बींचें जें साम्य मी दाखवून देईन त्यावरून ज्ञानेश्वरीय दृष्टिकोनांतूनच या कवितेचें लेखन बींनीं केलें आहे, या माझ्या विधानाची सत्यता सिद्ध होणार आहे. पण या सर्व तऱ्हेच्या सादृश्याचें अधिष्ठान दोघांच्या तत्त्वज्ञानाची एकरूपता हें आहे, हा माझा मुख्य मुद्दा आहे. त्या दृष्टीनें ज्ञानेशांनीं मूलतत्त्वाचा जगताशीं असलेला संबंध ' अमृतानुभवां'च्या ' शिवशक्तिसमावेशन ' या पहिल्या प्रकरणांत व सातव्या प्रकरणांतील १०२ ते २६७ या ओव्यांत ज्या प्रकारें वर्णिला आहे, त्या प्रकारेंच बींनीं ' पिंगा ' (द्वैतभान=विश्वव्यवहार ) व ' मी ' ( अद्वैतत्त्वाची जाणीव ) यांचे संबंध दाखविले आहेत कीं काय, हें तपासून पाहिलें पाहिजे. प्रस्तुत लेखाचा मुख्य उद्देश तोच आहे.

सांख्यांची प्रकृति, अव्यक्तवाद्यांचें अव्यक्त व वेदान्त्यांची माया यांना ज्ञानेश्वर ' अज्ञान ' असेंच म्हणतात. ( ' ...किती बोलों वायां । अज्ञान हें ॥ '—ज्ञाने. अ. १४–७१ ). या अज्ञानाचें खंडन अमृतानुभवांतील सातव्या प्रकरणांत त्यांनीं केलें आहे. ' जग असकी वस्तुप्रभा ' ( अमृ. ७–२८९ ) म्हणजे जग हें देखील मूळ वस्तुरूप, हा ज्ञानेशांच्या चिद्विलासवादी दृष्टिकोनाचा मुख्य सिद्धान्त आहे. भेदात्मक विश्वव्यवहारहि अभेदभाव दुणावण्यास कारणीभूत होतो, असें म्हणण्यामध्यें ज्ञानेशांना हेंच सांगावयाचें आहे कीं, विश्वव्यवहार हा अज्ञानजन्य नसून तो ज्ञानजन्य, ज्ञानमय व ज्ञानरूप आहे. ' मी-वांचूनि नाहीं । विश्वीं इये । ' ( ज्ञाने. अ. १०–११४ ), ' ...आघवें मीचि '—( ज्ञाने. अ. १४–१२७ ) अगर ' ... तळवटीं चिन्मात्रचि '—( अमृ. प्र. ७–२४ ) इत्यादि ज्ञानेशांचीं वचनें हेंच सांगतात.

बी कवींचा ' पिंगा ' हि अद्वयरंगांत अधिक रंग भरविणारा असल्यामुळें तो अज्ञानजन्य म्हणजे वेदान्त्यांच्या मताप्रमाणें मायाकार्य किंवा सांख्यांच्या कल्पनेप्रमाणें प्रकृतिकार्य असणें शक्य नाहीं. तेव्हां ज्ञानेशांच्या परिभाषेप्रमाणें ' माझा पिंगा ' याचा अर्थ सत् च्या जाणिवेचा म्हणजे चित्‌चा ( शिवभक्तीचा किंवा देवोदेवीचा ) विलासच होय. ज्ञानेशांची देवोदेवी ही सांख्यांच्या प्रकृतिपुरुषांप्रमाणें दोन भिन्न तत्त्वें नाहींत, तर सत्ता आणि ज्ञान अगर अस्तित्व आणि त्याची जाणीव यांच्याप्रमाणें तीं दोन्ही एकरूप किंवा एकात्मच होत. या दृष्टीनें पाहतां ' माझा पिंगा गोड गडे ! ' याचा अर्थ सांख्यांची प्रकृति स्वतःच्या कर्तृत्वाचें कोडकौतुक करीत आहे, असा घेतां कामा नये. " तत्त्वज्ञानामधील ' प्रकृति ' हाहि तिचा ( कवितेचा ) विषय असणें शक्य वाटतें " हें प्रा. जोग यांचें रूढ कल्पनेचा पुनरुच्चार करणारें विधान म्हणूनच बरोबर ठरत नाहीं. ' नाचण मी मुळची मोठी ' या ओळींतील नाचण ( नर्तिका ) या शब्दावरून येथें मुखस्तंभ पुरुषाच्या भोंवतीं पिंगा घालणारी सांख्यांची प्रकृतीच अभिप्रेत असावी अशी कल्पना पहिल्याप्रथम होते. पण अद्वयरंगांत रंग चढविणें हे द्वैतवादी सांख्यांच्या प्रकृतीचें वैशिष्ट्य नाहीं; उलट अद्वयरंगाचा भंग करणारेंच तिचें कार्य आहे, असें सांगितलें जातें.

ज्ञानेशांची देवी ( शक्ति ) किंवा मूलतत्त्वाची जाणीव ही मात्र ' भेद तंव तंव दुण । अभेदासी ' असें कर्तृत्व घडवून आणणारी आहे. त्यामुळें बींची पिंगा घालणारी स्त्री ही ज्ञानेशांच्या परिभाषेंतील शिवशक्तीच ( शिवाची, शिवत्वाची जाणीव ) होय, असें मान्य केलें तरच तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें या कवितेचा अर्थ सुसंगतपणें लागूं शकतो. सुसंगत अर्थनिष्पत्तीच्या प्रयत्नाकडेच आतां आपण वळत आहोंत.

ज्ञानेशांची शिवशक्ति हीच बींना येथें अभिप्रेत आहे असें मी म्हणतों, याला या कवितेच्या प्रारंभींच्या भागांतच भरभक्कम आधार मिळत आहे. पहिल्या दोन ओळींचा आशय प्रकृतीला लागू पडत नाहीं, हें आतांच आपण वर पाहिलें. त्यापुढच्या आठ ओळींत जाणिवेच्या पोटीं उद्भवणाऱ्या वृत्तींचें ( कल्पनांचें ) बींनीं वर्णन केलें








आहे. ते म्हणतात कीं, 'या वृत्ती नवनीता-प्रमाणें कोमल, ज्योत्स्नेहून अधिक कांतिमान्, दिग्रागांहून दिव्यतर आणि अकलंक अशा आहेत.' हें वर्णन मायाजन्य विकारांना किंवा अष्टधा प्रकृतीला बिलकूल लागूं पडत नाहीं. ज्ञानेशांच्या शक्तीचे क्रीडाविभ्रम किंवा जाणिवेच्या शलाका यांना मात्र तें लागूं पडणारें आहे. ज्ञानेशांच्या दृष्टिकोनाप्रमाणें त्यांची शक्ति ही सत्‌शीं एकात्मच असल्यानें सत्‌प्रमाणेंच (शिवाप्रमाणें) ती निष्कलंक, निरुपाधिक व चैतन्यमय अशीच आहे. ती प्रकृती-प्रमाणें जड किंवा मायेप्रमाणें सोपाधिक नाहीं. साहजिकच तिच्या पोटीं निर्माण होणाऱ्या (–ही केवळ रूपकाची भाषा आहे–) कल्पना या देखील निष्कलंक आणि चैतन्यमय (तेजस्वी, 'गोरट्या') अशाच असणार. म्हणून 'वृत्ति गोरट्या अकलंकी–माय तशा झाल्या लेकी !' असें बी वृत्तींसंबंधीं लिहूं शकतात.

## ज्ञानेशांच्या शैलीचें अनुकरण

पुढें ते सांगतात कीं,–'जाणिवेच्या या तेजस्वी लेकी (वृत्ती) इंद्रियांना कळूंहि न देतां आत्म्याच्या ठिकाणच्या सौरभरसाशी भ्रमराच्या आवडीनें पोटभर लुटतात.' ही कल्पना चिद्विलासवादी दृष्टि-कोनाप्रमाणेंच शक्य आहे. या ठिकाणीं ज्ञानेशांच्या शैलीची छापहि स्पष्ट दिसून येते. गीतेंतील आत्म-बोधाचा आनंद सेवन करण्यासंबंधीं 'हे शब्देंवीण संवादिजे। इंद्रियां नेणतां भोगिजे।' (ज्ञाने. अ. १–५८) किंवा 'आतां आत्मप्रभा नित्य नवी। तेचि करूनि ठाण दिवी॥ जो इंद्रियातें चोरूनि जेवी। तयासीच फावे॥' (ज्ञाने. अ. ६–२३) असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे. त्याला धरूनच

> 'श्रवण मनाला कळुं न दिलें
> कौशल्याची नवलाई
> रस चोरुनि प्याल्या बाई !'

असें आत्म्याच्या ठिकाणीं रत झालेल्या वृत्तींच्या पराक्रमाचें वर्णन बी करतात. अलंकारयोजना भिन्न असली तरी उपमानादाखल भ्रमराचाच उपयोग दोघांनीं केलेला दिसतो[१] हें सादृश्यहि विचार्य आहे.

आत्मबोधाचा रस पिऊन प्रमत्त झालेल्या वृत्तींनीं अहंभावनेला (जाणिवेलाहि) फेर धरायला लावून 'नाच मांडिला एकपणीं' या नृत्यांतील धुंदीचें व एकत्वाचें वर्णन कवीनें मोजक्या शब्दांत अगदीं उत्कृष्टपणें केलें आहे. त्यांतहि कल्पना नि आविष्कार या दोन्ही दृष्टींनीं ज्ञानेश्वरांच्या शैलीचें अनुकरण पुढील ओळींपुरतें तरी जाणवल्याखेरीज राहत नाहीं :

> 'अनेक नेत्रांचें बघणें
> अनेक कंठांचें गाणें
> अनेक चरणांचें जाणें
> अनेक चित्तांचें स्फुरणें
> दृष्टी, वाणी, गती, मती
> एकच येथुन तेथुन ती.'

या ओळी वाचतांना ज्ञानेश्वरांच्या अभ्यासकाला–'दो दांडी एकी श्रुति। दोहों फुलीं एकी दृति॥ दोहों दिवीं एकी दीप्ति। दो ओठीं येकी गोठी...' इत्यादि 'अमृतानुभवां'तील (प्र. १–१८–१९) ओळींची आठवण झाल्याखेरीज राहणार नाहीं.

'पिंगा' खेळणारीला धुंदी येऊन भोंवतालचें सर्व वस्तुजात गरगर फिरतां फिरतां एकरूप झालेलें दिसतें, त्याप्रमाणें मूलतत्त्वाची जाणीव आणि तिच्या वृत्ती यांची एकरूपता होतांच विविध नामरूपानें नटलेलें विश्वहि तद्रूप होऊन जातें. विविधतेचा लय होतो तो याच अर्थानें. बींनीं म्हटलें आहे :

> 'प्रवाह बहुमुख जो होता वाहे एकमुखें आतां'

वृत्तींमुळेंच (कल्पनांमुळेंच) पदार्थरूप जगत् भिन्नत्वानें प्रतीत होत असतें. त्या कल्पनाच मूळ जाणिवेच्या पोटीं लीन झाल्या कीं, विश्वाची वेगळी प्रतीतीहि नष्ट होते. विश्व–वृत्ति–जाणीव हीं साऱ्रींच एकरूप किंवा चिन्मय होऊन जातात. हा आध्यात्मिक अनुभवच

> 'वृत्तींचें बळ मज मिळतां
> विश्व सहज आलें गिळतां.'

---

[१] 'जैसे भ्रमर परागु नेती। परी कमळदळें नेणती' ॥–(ज्ञानेश्वरी अ. १–९९). 'फुलेंचि आलीं भ्रमर।' (अमृतानुभव, प्र. ९–४). 'वृत्ती झाल्या हो भ्रमरी !' (बी)








या ओळींमध्यें बींनीं वर्णिला आहे. कवितेच्या या दुसऱ्या भागांत विश्वलयाच्या बाजूनें पूर्णाद्वैताचा सिद्धान्त कवीनें मांडला आहे, तर कवितेच्या तिसऱ्या भागांत आत्म्याचें विश्ववैभव वर्णन करून तोच विचार दृढतर केला आहे.

## ' पिंगा ' म्हणजे विश्वव्यवहारच

' पिंगा ' म्हणजे द्वैतभान याची व्याप्ति किती सर्वंकष आहे, याचें वर्णन कवि या भागांत करीत आहे. जाणीवेच्याच भिन्न शलाका असणाऱ्या वृत्तीं-मुळेंच भावरूप पदार्थसृष्टि व अमूर्त कल्पनासृष्टि निर्माण होते. 'अहं'ला जाणीव झाल्यावरच जगाची निर्मिति होते. चित्ताचें वृत्तिप्रवाहात्मक कार्य सुरू झाल्यावरच जिवाच्या दृष्टीनें जगाला अस्तित्व प्राप्त होतें. म्हणूनच बींची पिंगावाली स्त्री म्हणते कीं

' मी येतां उदयोन्मुख तें
जग तेव्हांची संभवतें. '

याचाच तपशील अगोदरच्या १४ ओळींत देण्यांत आला आहे तो असा:—स्वर्ग, आकाश, भूलोक, त्यांतील चार खाणी ( अंडज, स्वेदज, उद्भिज्ज, जारज या चार योनी ), किंवा मानवी दृष्टीनें करण्यांत आलेलें ' दानव मानव सुरासुर ' हें जीवांचें चतुर्विध वर्गीकरण इत्यादि सर्व गोष्टींची प्रभवशक्ति मूलतत्त्वाची जाणीव हीच होय. म्हणून ती म्हणते कीं, " हें सर्व मीच आहे " आणि ' मी, मजविण तें निःसार ! '

## मायावादी दृष्टिकोनाचा अव्हेर

ही जगन्निर्मितीची क्रिया मायाकार्य आहे, हें त्रिगुणात्मक जग बंधनकारक आहे अशा तऱ्हेची जगासंबंधींची तुच्छतेची भावना हेंच एक प्रकारचें क्षुद्रपण होय. पण चिद्विलासाच्या दृष्टीनें या विश्वाकडे पाहूं लागलें कीं, तें क्षुद्रपण नाहींसें होतें. विश्वाबरोबर विश्वप्रक्रियेच्या कारकशक्तीचें महत्त्व वाढीस लागतें. जीर्ण बंध म्हणजे स्वतःकडे क्षुद्र भावनेनें पाहाण्याची लागलेली संवय सुटली कीं, स्वतःची खरी ओळख स्वतःला पटते. हाच आशय

' दुर्बलपण पहिलें गेलें,
क्षुद्रपणांतुन मी सुटलें,
जीर्ण बंध सारे तुटले,
मी माझी मज सांपडलें ! '

या चार ओळींत बींनीं सांगून टाकला आहे.

मी-तूं या भेदबुद्धिमुळेंच गुणावगुणांचें जननीत्व स्वार्थभावनेकडे जाऊन त्यांना विपर्यस्त स्वरूप प्राप्त होतें. पण ती भेदबुद्धीच नष्ट होऊन ' सर्व मीच आहे ' अशी स्व-स्वरूपाची ओळख पटल्यावर स्वार्थभावनेबरोबर गुणावगुणांची विपर्यस्त कल्पनाहि नष्ट होते. गुणभेदांना स्वकीयत्व,स्व-धर्मत्व प्राप्त होतें. म्हणजे गुण—गुणी—गुणविषय किंवा प्रेम—प्रेमी—प्रेमविषय या त्रिपुटींत भेदच न उरल्या-मुळें ' प्रेमास्तव आतां प्रेम ! ' अशी एकच प्रतीति शिल्लक उरते. याच आशयानें बींनीं पुढील ओळी लिहिल्या आहेत :

' स्वार्थजनित सद्गुणभास
जडले होते अंगास
ते गुण झाले मम धर्म
प्रेमास्तव आतां प्रेम ! '

## ज्ञानेशांच्या आत्मविचाराचा पडसाद

या प्रतीतीमुळें सर्व भूतमात्र किंवा विश्वजात यांच्यांत समभावनेचा आनंद दाटून येतो ( ' भूतें आलीं साम्याला...मोहर आनंदा आला ! '). तेव्हां अशा एकात्म स्थितीचा उल्लेख 'विश्वबंधुत्व' या लौकिक किंवा सामाजिक गुणांनीं करणेंच शक्य नाहीं. कारण ' विश्वासकट एक आत्माच भरून राहिला आहे ' या प्रतीतीनंतर विश्वबंधुत्वादि नातीं अपुरींच ठरतात. कारण तीं द्वैतबोधकच होत.

याच भूमिकेनें जीवाची वेगळी व्याख्या ज्ञानेश्वर करीत नाहींत. जीव हा चिद्रूपच. सर्वत्र एक आत्माच आहे. 'अमृतानुभवां'त ( प्र. ७–१४६ )
' तया आत्मयाचिया भाखा। न पडेचि दुसरी रेखा ।।
जरी विश्वा अशेखा। भरलें आहे ।। '

हा ज्ञानेशांच्या आत्मविचारांतील एक महत्त्वाचा विचार आहे. म्हणून तर–' ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें। तैं विभूतिभेदें काय करावें। ' या शब्दांत विभूतिभेदाला कांहींच महत्त्व नाहीं असें दहाव्या विभूतियोगाच्या अध्यायांत प्रारंभींच ज्ञानेश्वर सांगून टाकतात.








' भूतें मी—मजला नातें—
द्वैत कसें हें संभवतें ?'

या बींच्या ओळींत ज्ञानेशांच्या वरील विचाराचाच पडसाद ऐकूं येतो.

यापुढची अद्वैताची परमोच्च प्रतीति म्हणजे अजातवादाची भूमिका होय. चिद्विलासवादी दृष्टीनें विश्व व विश्वात्मा यांचें ऐक्य सिद्ध करतां करतां,

'आणि पूर्ण अहंता वेठलों । सैंध आम्हीच दाटलों ॥
ना लोपलों ना प्रकटलों । कोणा होउनी ' ॥
——अमृ० प्र. १०–१५

' तैसें असणें कां नसणें । हें कांहींच सानुसवाणें ॥
नसोनि असणें । ठायें ठावो ॥ '—अमृ०प्र. ४–३७

'तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं कैंहीं न जायें
जैसा रात्री दिवसे नोहे । द्विधा रवि ॥ '
ज्ञाने. अ. १५–४५४

यांसारख्या ओव्या लिहितांना ' जगत् झालेंच नाहीं ' या विचाराच्या म्हणजे अजातवादाच्या जवळपासच ज्ञानेश्वर जातात. याच विचाराचा स्पष्ट अनुवाद बींनीं पुढील ओळींत केला आहे :

' मज कसलें जाणें येणें
भाव-अभावाविण असणें.'

या अजातवादाच्या विचारानेंच या भागाची पूर्णता कवीनें केली आहे.

### स्व-स्वरूपाचें विश्वात्मक वैभव

' कांहीं ( आत्मरूपाखेरीज ) झालेंच नाहीं ' हा अजातवादाचा विचार म्हणजे अद्वैतबोधाची अत्युच्च पायरी होय. पण अजातवाद मान्य करणें म्हणजे शून्यवाद पत्करणें नव्हे. म्हणूनच एका बाजूला अजातवादाची भूमिका मांडणारे ज्ञानेश्वर दुसऱ्या बाजूला विश्वात्मक अशा स्व-स्वरूपाचें वैभवहि मोठ्या गौरवानें वर्णन करतात. अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणांत शिवशक्तीच्या क्रीडेचें वर्णन करीत असतांना ज्ञानेश्वर लिहितात कीं

' पतीचेनि अरूपपणें । लाजोनि अंगाचें मिरवणें ॥
केलें जगा येव्हडें लेणें । नामरूपाचें ' ॥ ३० ॥
'...कांतेचिया भिडा। अबला हो जगा येव्हडा'॥ ३४॥

हेंच वैभव वर्णन करण्याच्या हेतूनें बींनीं ' विश्ववैभवालंकरण ' या शब्दाची योजना केली आहे.

ज्ञानेशांप्रमाणेंच मागील भागांत अजातवादापर्यंत मजल मारणारे बी कवीहि सत्‌च्या जाणिवेची स्वयंपणाची थोरवी कवितेच्या चौथ्या भागांत मोठ्या गौरवानें गात आहेत. ' मीपण माझें कां विसरूं ? ' या सवालानें सुरुवात करून ज्ञानेशांच्याच शैलीनें अहंभावनेची श्रीमंती पुढील शब्दांत बींनीं वर्णन केली आहे :

' म्लानपणाविण लावण्य, क्षीणपणाविण तारुण्य,
मंगलमांगल्यायतन, नित्यानंद निरावरण,
विश्ववैभवालंकरण, तें माझें, तें स्वयंपण ! '

' ही स्वयंपणाची शुद्ध जाणीव ( मीपण ) सोड ' असें अहंभावनेला कोणी तरी म्हणेल काय ? ही कल्पना

" दीपकळी गे ! दीप्तीला
सोड—' म्हणे का बुध तिजला ? "

या दृष्टान्तानें बींनीं मांडली आहे, त्यामध्यें—

' दीप्तीचीं लुगडीं । दीपकळिके तूं वेढी
हें न म्हणतां ते उघडी । ठाके काई ॥ '

या ज्ञानेशांच्या ओवीचा ( अमृ०-प्र. ९–४६ ) स्पष्ट ध्वनि ऐकूं येत नाहीं काय ?

### ज्ञानेशांच्या चिद्विलासवादाचा अनुवाद

विश्ववैभवालंकरण असणाऱ्या स्वयंपणाच्या जाणिवेंतूनच मूलतत्त्व जगद्रूपानें सारखें विलसत असते, हाच भाव ' क्षणीं क्षणीं नीच नवी ! दृश्याची चोख मदवी ॥ दिठीकरवीं वेढवी । उदार जे ॥ ' –( अमृ० प्र. ७–१२६ )–या ओवींत ज्ञानेश्वरांनीं मांडला आहे. त्याच अर्थानें ' पिंगा आला भर रंगा ' असें कवितेच्या शेवटल्या भागांत बी म्हणतात, पण लगेच ' आत्मभाव भिडला अंगा ' अशी अद्वैतबोधाची पुष्टीहि त्याला जोडतात. पांचव्या भागाच्या प्रारंभींच्या दोन ओळींत कवितेच्या पहिल्या दोन ओळींप्रमाणेंच ' द्वैत दशेचें आंगण ' या ओवींतील सिद्धान्ताचा किंवा

' दृश्याचिया सृष्टी । दीटीवरी दिठी । उठलिया तळवटीं । चिन्मात्रचि या ॥ ' ( अमृ. ७.–१२४ ) ओवींतील भावार्थाचा स्पष्ट ठसा उमटला आहे. तसेंच,

' बुद्बुद हो कीं कल्लोळ
अर्णवपद माझें अढळ '








या बींच्या ओळींतहि वरील ओवीचें स्पष्ट प्रतिबिंब आढळेल.

जगदुत्पत्तीची क्रीडा ऐन रंगांत आली, तसतशी आत्मभावाची ( एकत्वाची ) जाणीव वाढतच गेली, असें पहिल्या दोन ओळींत सांगून बी पुढें म्हणतात कीं, अद्वैत पटूनहि द्वैताची उभारणी चालूच राहिली, याचें कारण 'अहं'च्या जाणिवेचा ( नर्तिकेचा ) द्वैतक्रीडा ( नर्तन ) हा स्वभावच आहे म्हणून जाणीव आपल्या वृत्तींना ( कल्पना-सृष्टीला ) व भुवनसमूहाना ( पदार्थसृष्टीला ) 'नाचा ! नाचा ! ' असेंच सांगत आहे. मात्र ही जाणिवेची नृत्यक्रीडा अहंच्या (शिवाच्या = मूलतत्त्वाच्या ) व्यतिरिक्त अशी नाहींच. त्यामुळें प्रकृतीच्या क्रीडेप्रमाणें किंवा मायेच्या खेळा-प्रमाणें ही जाणिवेची क्रीडा ( पिंगा = शिवशक्तीचा विलास=विश्वव्यवहार ) जीवांना तापदायक होत नाहीं असें ज्ञानेशांची तात्त्विक दृष्टि सांगते. म्हणून तर ' अमृतानुभवां 'त ( ७–१३५ )

' पाणी कल्लोळाचेनि मिसें। आपणपें वेल्हावें जैसे ॥
वस्तु वस्तुत्वें खेळो ये तैसें । सुखे लाहे ॥ '

असें म्हणून ज्ञानेश्वरीच्या पसायदानांतील सर्वांविषयीं सदिच्छा व्यक्त करणाऱ्या आपल्या शब्दांना ( ' किंबहुना सर्व सुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । ) व त्या पाठीमागच्या आपल्या नैतिक भूमिकेला समर्पक असें तात्त्विक अधिष्ठान ज्ञानेश्वर मिळवून देतात. त्याचप्रमाणें

' माझा पिंगा गोड गडे !
अद्वयरंगीं रंग चढे. '

या शब्दांनीं ज्ञानेशांच्या तात्त्विक अधिष्ठानावर उभे असलेले बी देखील ज्ञानेशांप्रमाणेंच सर्वां-विषयीं सदिच्छा व्यक्त केल्याखेरीज कसे राहतील ? म्हणूनच बींच्या प्रस्तुत कवितेचा शेवटहि

' नाच आपला भूतांला
होवो शान्तिप्रद सकलां ! '

या ओळींनीं झाला आहे. तात्त्विक दृष्टयाहि तो समर्पकच नव्हे काय ? कारण चित्‌चा विलास असणारा हा पिंगा किंवा विश्वव्यवहार हा चित्‌चेंच एक रूप असलेल्या ' भूतांला ', ( जीवांना ) सुखदायकच होणार.

ज्ञानेश्वरांचाच आध्यात्मिक दृष्टिकोन डोळ्यांपुढें ठेवून बींनीं आपली 'पिंगा' ही कविता लिहिली आहे, असें मी म्हणतों तें याचसाठीं !

---

## श्रीज्ञानेश्वरी वाचल्यानंतर–

चन्द्रिकेचे थेम्ब, वाटे, शब्द तुझे गोमटे
गुल्छबूच्या मन्द गन्धें वर्ण केले चोखटे
ज्ञानदेवा, पाहुनीया कोवळीं हीं अक्षरें
ज्ञानदेवी-मोगरी कीं शब्द-पुष्पें मोहरे !
' अमृतातें पैज जिंकी ' मेळवीलीं अक्षरें
जीं जिवाचीं तापलेलीं तोषवीतीं अन्तरें
मायबोली मन्थुनी तूं शब्द-मोतीं वेंचिले
आणि ओवी-क्षौम-सूत्रीं कौशलें तूं गोंविले
वाचतांना पौर्णिमेच्या चान्दरातीं संचरें
तप्तजीवां स्नान गंगेचेंच लाधें कीं खरें
जन्मदेच्या आङ्कीं किंवा मी परागीं लोळतों
अन् गुलाबी कोणि पाणी शान्तवाया शिम्पतो !
मानसीचा हंस भोगी अम्बुजांचा ताटवा
शब्दमोतीं भक्षितां ये तृप्तता माझ्या जिवा
अर्थ-कोशीं कीं मरन्दीं जीव माझा गुंगतो
पुष्प कोषीं मत्त जैसा भृंग लोभें गुंगतो
जन्मदेची प्रीति किंवा शान्ति-देवी मूर्त ती
सज्जनांची भावना वा भक्ति, वाटे सन्मती
कोणि कोपें दापितां तें बाळ मातेचे कडे
धांव घेई, शान्तवोनी, चुम्बुनी ती घे कडें
–आणि तापें तापितां मी तूज आई, शोधितों
ज्ञानदेवी ! एक ओवी नीववीते ताप तो
मोहिनीनें देवलोकीं निर्जरां जें पाजिलें
ज्ञानदेवा, शेष तुम्हीं भूतलीं तें आणिलें
अमृतानें मत्त होती देव ते अन् देवता
ज्ञानदेवी कीं सुधा ही दे मनातें शान्तता
ज्ञानदेवीरूप घेई कीं स्वयें ती शारदा
' ब्रह्मविद्येच्या सुकाळें ' वारिते ही आपदा !

— विश्वनाथ के. महाबळेश्वरकर








जयपूरच्या इतिहास-परिषदांकडे दृष्टिक्षेप : म. म. दत्तो वामन पोतदार

# इतिहासप्रसिद्ध राजस्थानचें ओझरतें दर्शन

भारताच्या इतिहासामध्यें राजपूत आणि राजस्थान यांचें एक विशिष्ट स्थान आहे यांत शंका नाहीं. प्रख्यात इतिहासकार टॉड यानें आपल्या राजस्थानच्या इतिहासाच्या योगानें इंग्रजी भाषा जाणणाऱ्या जगतांत राजपूत आणि राजस्थान यांच्याविषयीं विलक्षण ओढ उत्पन्न केली आहे. मेवाडांतील उदेपूरचे सिसोदीय महाराणे, जोधपुरांतील राठोड, बुंदीचे हाडे किंवा जयपूरचे कछवा वंशांतील राजपूत आणि त्यांच्या सूर्यवंशी आणि चंद्रवंशी परंपरा यांचीं पराक्रमगीतें यांनीं हिंदुस्थान दुमदुमून गेला. इंग्रजांची सत्ता भारतावर स्थापन झाल्यावर हे निरनिराळे राजेमहाराजे, राणे आणि महाराणे यांचीं संस्थानें तशींच कायम राहिलीं आणि राजस्थानांत साधारणपणें जुनी राजवट आणि जुना जमानाच चालू राहिला.

## दर्शनीय आणि अभ्यसनीय राजस्थान

टॉडच्या पुस्तकांत विशेषेंकरून राजस्थानांत प्रचलित असलेल्या दंतकथा आणि आख्यायिका यांचा भरणा विशेष आहे. राजस्थानच्या सशास्त्र इतिहासाचा पाया तसें पाहिलें तर अद्याप घातला जावयाचा आहे. इतिहासाला आधारभूत असे समकालीन लेख, शिलालेख, नाणीं आणि ग्रंथ वगैरे साहित्य राजस्थानांत भरपूर असतांहि, त्याचें संशोधन आणि प्रकाशन यांस अद्यापि आरंभ झालेला नाहीं. राजस्थानांत गांवोगांवीं छोटे छोटे ठिकाणदार, ठाकूर आणि जहागिरदार भरलेले आहेत. चंद्रवंशी आणि सूर्यवंशी कुळ्यांशीं ते आपला संबंध जोडीत असतात, आणि आपल्या ठिकाणीं आपल्याच अभिमानांत चूर असतात. एका दृष्टीनें पाहिल्यास राजस्थानाचा इतिहास हा कुळ्यांच्या हेव्यादाव्यानें भरलेला आहे असें आढळून येईल. राजस्थानांत सहज हिंडलें असतां गांवोगांवीं ठाकुरांचे आणि ठिकाणदारांचे महाल, गढ, कोट आणि किल्ले यांचा पसारा दिसून येतो. त्याचप्रमाणें या क्षत्रिय राजांची प्रधानकी करणारे त्यांचे ब्राह्मण पुरोहित यांचे वंशजहि जागजागीं आढळून येतात. तसेंच दगडी जाळीदार इमारतींचीं कामें करणारे पाथरवट आणि लांकडावर निरनिराळ्या तऱ्हेचें नक्षिकाम आणि खोदकाम करणारे खैरादी कारागीर आणि दस्तकार यांचा भरणा राजस्थानांत पुष्कळ आढळतो. गायन-वादन आणि नृत्य या त्रिविध शाखांनीं सजविलेलें संगीत आणि ज्योतिष यांचाहि प्रसार आणि जोपासना राजस्थानांत मुबलक प्रमाणांत झालेली आढळून येते. तेथील देहाती जीवन अजून जुन्या वळणाचेंच आहे. मेवाडी, मारवाडी, बागडी, थाळी, हाडौती वगैरे लहानसहान भाषाभेदानें राजस्थानी भाषेचा प्रसार खेडेगांवीं सर्वत्र आढळून येतो.

राजस्थानच्या दक्षिण-पूर्व भागामध्यें जमीन उपजाऊ आहे आणि कित्येक ठिकाणीं दुपिकी आहे. त्यामुळें गहूं, चावल, बाजरी, मका, मूग, मठ, जिरा यांचें पुष्कळ पीक तिकडे येतें. डाळिंब, संत्रें, आणि आंबे वगैरे फळेंहि तयार होतात. पाणी एकंदर कमी असल्यामुळें केळीं तिकडे क्वचितच तयार होतात. सवाईमाधोपूरजवळ सुवासिक वाळ्याचें पीक येतें; म्हणून तेथें खस अत्तर उत्कृष्ट प्रकारचें तयार होतें. सांभरसारख्या प्रसिद्ध क्षार सरोवरांतील मीठ लोकांच्या वापरांत आहे.








रुई किंवा कपास याची उत्पत्ति राजस्थानांत होते आणि हातमागावरील कापड विणण्याचें काम जागोजागीं चालतें. विणण्याप्रमाणेंच कापडाला निरनिराळ्या प्रकारचे रंग देऊन आणि त्यावर छापाची नक्षी उठवून तें शोभिवंत कापड अंगावर धारण करण्याची हौस स्त्री-पुरुषांत अद्यापि आहे. राजस्थानी शूर पुरुष मिशांचे आंकडे वर चढविण्यांत, त्याप्रमाणेंच डोक्यावर फेटे धारण करण्यांत किंवा तऱ्हतऱ्हेचीं पागोटीं बांधण्यांत भूषण मानतात. या पटक्या-पागोट्यांवरहि विविध प्रकारच्या रंगांचे ठिपके किंवा बूंद काढलेले असतात. हें पटकेरंगाईचें काम फार कौशल्याचें आणि जिकिरीचें आहे. याला ' चूंदडी बंदेश 'चें काम म्हणतात. सुती कापडाप्रमाणेंच राजस्थानांत ऊनी कपडाहि होतो. नुमदा आणि घुग्गी हे तेथील ऊनी कापडाचे प्रकार प्रसिद्ध आहेत.

निरनिराळ्या स्वाभिमानी राजवटींनीं आपआपल्या नांवांनीं पाडलेलीं नाणीं राजस्थानांत अद्यापि आढळून येतात. अरवली पहाडाच्या उभ्या-आडव्या रांगा राजस्थानांत इतस्ततः पसरल्या असल्यामुळें आबू, रघुनाथगड, कुंभलगड, मांडलगड, तारागड वगैरे उत्तुंग शिखरें आणि या शिखरांवरील प्राचीन देवालयें तिकडे प्रसिद्ध आहेत. राजस्थानांतील मकराण्याचा शुभ्र (दगड) संगमरवर हा हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. या संगमरवरावरील मूर्तिकाम आणि नक्षीकाम, तसेंच मीनागिरीचें काम इत्यादि अनेक कलाकुसरीचीं कामें राजस्थानांत चालतात. पितळेचीं भांडीं आणि विविध प्रकारचीं खेळणीं राजस्थानांत तयार होतात. राजस्थानांतील बराच भाग रेताड असल्यामुळें अशा रेगिस्तानांत अद्यापि वाहतुकीसाठीं उंटांची योजना होत असते. रणथंभोर आणि चितोडसारखे अजस्र पहाडी किल्लेही राजस्थानांत आहेत. पुष्करनाथद्वार यासारखीं अखिलभारतीय तीर्थेंहि राजस्थानांत आहेत. पहाडांप्रमाणें मोठीं मोठीं जंगलेंहि आहेत. येणेंप्रमाणें राजस्थान हा एक मोठा दर्शनीय आणि अभ्यसनीय असा देश आहे.

### ऐतिहासिक साधनें

टॉडनंतर राजस्थानच्या इतिहासाची फेरमांडणी करणारे श्री. म. म. गौरीशंकर ओझा यांनीं राजस्थानच्या इतिहासाचें साहित्य गोळा करणें आणि तदनुसार टॉडलिखित इतिहासाची दुरुस्ती करणें या बाबतींत फार मोठा प्रयत्न केला. परंतु, राजस्थानांतील भाटचारणांजवळील बहुमोल साहित्याच्या साधनांचें संशोधन, मोजदाद आणि प्रकाशन करण्याचें कार्य डॉ. टेसीटोरी यांनीं केलें, त्याचें महत्त्व जाणलें पाहिजे. देवीप्रसाद वगैरे विद्वानांनीं केलेलें कार्यहि महत्त्वाचें आहे. राजस्थानांत रासो नांवाचे ग्रंथ किंवा वाता (वार्ता), ख्यात (ख्याती) इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध असणारें साहित्य-तोंडी आणि लेखी असें—तिकडील डिंगल भाषेंत रचलेलें सर्व राजस्थानभर पसरलेलें आहे. त्याचप्रमाणें मुसलमानी काळांत विशेषतः जयपूर, जोधपूर वगैरे ठिकाणीं दिल्ली, आग्र्याच्या बादशाहीशीं संघर्ष-सहकाराच्या घडलेल्या अनेक घटनांसंबंधीचें अखबारा वगैरे इतिहासोपयोगी फारसी भाषेंतील साहित्य राजस्थानांत अमाप आढळून येईल. जयपूर येथील पोथीखान्यांत हें साहित्य विपुल प्रमाणांत संगृहीत करून ठेवण्यांत आलें आहे. भाटचारणांप्रमाणेंच ब्राह्मण-जैन पंडितांनीं संस्कृत भाषेंत काव्यरूपानें रचलेलें साहित्यहि कांहीं कमी नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी महाराष्ट्रीय घराण्यांच्या शोधाच्या निमित्तानें आम्ही जयपूर शहरांत हिंडत असतां आम्हांस केवळ पोषाखावरून जयपूरच्या बाजारांत एका गृहस्थानें हटकलें आणि नंतर त्याच्याकडून परभणीकरशास्त्री यांच्या घराण्याचा हवाईमहालासमोर तपास लागला. हें राजगुरूंचें घराणें आहे. त्यांच्या घरीं पोथ्यांचें मोठें भांडार आहे. त्यांत ' जयवंश ' या नांवाचा अनेक सर्गांचा एक संस्कृत ग्रंथ आम्हांस आढळला. त्यांत जयपूरचे सवाई जयसिंह यांच्या चरित्राबद्दल पुष्कळ ऐतिहासिक माहिती आहे. ती ' भारत-इतिहास-संशोधक ' मंडळानें टिपणरूपानें प्रसिद्ध केली आहे. जयपूर विद्यापीठाचे सांप्रतचे कुलगुरु पुण्याचे रँ. डॉ. महाजनी यांच्या प्रयत्नामुळें तो मूळ ग्रंथ नवीन राजपुताना विद्यापीठानें प्रकाशित करण्याचें ठरविलें आहे. परंतु या विद्यापीठाकडे ऐतिहासिक साधनसंग्रह आणि प्रकाशन करण्याविषयीं आम्हीं पाठविलेली

योजना अद्यापि कार्यवाहींत आलेली नाहीं. जोधपूर, उदेपूर, बिकानेर, कोटा, जैसलमीर आदि संस्थानांनीं बनलेल्या राजस्थानांत परस्परांचे जुने हेवेदावे आणि मानापमान यांची नीट व्यवस्था लागून त्वरित प्रगति करण्याच्या कामीं थोडें थोडें यश येत चाललें आहे. उदेपुरांत 'सरस्वती-भांडार' नांवाच्या राजकीय संग्रहांत अनेक बहुमोल ग्रंथ आहेत. बिकानेर येथील 'अनूप-संस्कृत-ग्रंथ-भांडार' केवळ अपूर्व आहे. त्यांतील साहित्यांत छत्रपति शिवाजी महाराजांवरचें एक 'कवित्त' डिंगल भाषेंत प्रसिद्ध झालेलें इकडे कोणांस माहीत नाहीं. भाटचारणांकडील मराठ्यांबद्दलची माहिती देणारें कांहीं चारणसाहित्य पुण्यांत राहणारे श्री. श्रीवास्तव यांनीं जमा केलेलें आहे. जयपूरचे ठाकूर नरेंद्रसिंह यांनीं ईश्वरसिंहाचें चरित्र हिंदींत प्रसिद्ध केलें आहे आणि जयपूर वंशाच्या पराक्रमाचें वर्णन करणारें 'थर्टी डिसाइसिव्ह् बॅटल्स् ऑफ् जयपूर' या नांवाचें एक पुस्तक इंग्रजींत प्रसिद्ध केलें आहे. ठाकूरसाहेबांनीं स्वतः डिंगल भाषेंत या विषयावर एक 'वीर सत्सई' रचिली आहे. जयपूर राज्यांतील पहिल्या नंबरचे चौमूचे ठाकूर यांच्या राज्यांतील श्री. हनुमान शर्मा यांनीं हिंदींत जयपूर राज्याचा एक इतिहास प्रसिद्ध केला आहे. त्यांत स्वतःच्या संग्रहांतील जुन्या टिपणांच्या आधारें पुष्कळ नवीन माहिती त्यांनीं दिली आहे. राजस्थानी साहित्यांत विक्रमसंवत् आणि देशी शक, महिने, मिती यांच्या विपुल नोंदी आढळतात. तथापि, महाराष्ट्रांत आपण केलें आहे त्याप्रमाणें अद्यापि पत्रव्यवहार, महजर वगैरे मूलसाहित्य अजून राजस्थानांत म्हणावें तसें प्रसिद्ध झालेलें नाहीं. विपुल प्रमाणांत त्याचें अस्तित्व मात्र तिकडे आहे यांत शंका नाहीं. मराठे आणि राजपूत यांच्या संबंधांवर संभाजी आणि रामसिंग यांचा कांहीं पत्रव्यवहार संस्कृत भाषेंत झाला तो जयपूरच्या पोथीखान्यांत आहे. परवाच जयपूरच्या सफरींत 'भारत-इतिहास-संशोधक-मंडळा'चे श्री. ग. ह. खरे यांना उदयपूरचे राणे व आपले पहिले बाजीराव बल्लाळ प्रधान यांच्यांत संस्कृतांत झालेला पत्रव्यवहार आढळला. मराठ्यांचा संबंध आल्यानंतर मोडी लिपींत झालेला पत्रव्यवहारहि जागजागीं तिकडे असल्याचें आढळतें. राजपुतान्यांतील इंग्रज सरकारच्या वकालती किंवा वसाहती आतां बंद झाल्या आहेत; आणि या सत्तान्तराच्या काळांत यांतील कांहीं साहित्य जाळून टाकल्याचा बाजवी बोभाटा आहे. तथापि, उरलेसुरलेलें साहित्य भारत-सरकारच्या दफ्तरखान्यांत जमा झालेलें आहे. श्री. झाबरमल शर्मा व श्री. सूर्यनारायण शर्मा, वगैरेंनीं लिहिलेले 'खंडेलोंका इतिहास' किंवा 'नाथावतोंका इतिहास' अशासारखे लहानमोठे ग्रंथहि प्रकाशित झालेले आढळतात. एवंच राजस्थानांत ऐतिहासिक साहित्य अपरंपार भरलेले आहे.

सामाजिक इतिहासाला उपयोगी पडणारें साहित्यहि तितकेंच अफाट आहे. हें कलकत्याच्या 'राजस्थान रिसर्च सोसायटी'नें प्रसिद्ध केलेल्या 'राजस्थान के लोकगीत' यांसारख्या प्रकाशनांवरून सहज लक्षांत येईल. राजस्थानाचा आणि मराठ्यांचा निकट संबंध आला होता, त्यामुळें या साहित्याचा आपणांस कसून अभ्यास करणें आवश्यक आहे. त्यायोगें आपल्या प्रचलित ज्ञानांत पुष्कळ भर पडून नवीन दृष्टीहि प्राप्त होईल. आपल्याकडे प्रकाशित झालेल्या मराठी ऐतिहासिक साधनांत राजस्थानांतील अनेक स्थळांचा उल्लेख जागजागीं येतो. बाजीरावांच्या मातुःश्री राधाबाई तीर्थयात्रेच्या निमित्तानें तिकडे गेल्या असतां त्यांचा तेथें कसा सत्कार झाला याचा समग्र तपशील आपणांस मराठी पत्रांतून मिळालेला आहे. तो पाहतां भारतीय संस्कृतींतील स्त्री-गौरवाचा कौतुकास्पद पुरावा आपणांस वाचावयास मिळतो. परस्परांतील प्रत्यक्ष युद्धें चालू असतांहि या सत्काराला बाध आला नाहीं. फरुकाबादचे मराठ्यांचे विरोधी महंमद बंगष यांनीं देखील अत्यंत आदरानें बाईचा आपल्या मातुःश्रीप्रमाणें सत्कार केला. या प्रसंगाचे कागदपत्र वाचीत असतां जयपूर, किशनगढ वगैरे अनेक स्थळीं घडलेल्या प्रसंगांमुळें मराठ्यांना तीं तीं स्थळें जवळचीं वाटतात. चितोड, नागोर, जयपूर, कोटपुतळी वगैरे ठिकाणीं किंवा राजपुतान्यांतील गांवोगांवीं आपला संबंध आलेला आहे. म्हणून








राजपूत आणि महाराष्ट्र यांच्या इतिहासाचा विशेष अभ्यास आपण करणें अगत्याचें आहे. पुणें विद्यापीठांत तशी अभ्यासाची कांहीं योजना झाली तर ती समुचित ठरेल.

### सिंधुसंस्कृतीचा विस्तार !

राजस्थानांत प्राचीन ठिकाणेंहि पुष्कळ आहेत. त्यांचें संशोधन अलीकडे सुरू झालें आहे. जयपूर, सीकर वगैरे ठिकाणीं वस्तुसंग्रहशाला आहेत. ॲडके वेब, कार्लाइल वगैरे युरोपियन लोकांनीं केलेल्या दौऱ्यांतून पुष्कळ माहिती व वस्तू जमा केल्या आहेत. जयपूर येथील वस्तुशाला ही एक नामांकित अशी शिल्पकृति आहे. दोन-दोनशें किंवा तीन-तीनशें वर्षांपूर्वींचें, इराण अगर पर्शिया देशांत तयार केलेले गालीचे वगैरे शेंकडों वस्तू तेथें ठेवल्या आहेत. आभनेरी, आमेर, रणथंबोर, चाकसू, बैराट, हर्षपर्वत वगैरे स्थळीं मिळालेले अनेक प्राचीन मूर्तिलेख वगैरेंचे संग्रह आतां पुराणावाट मधून आमेर येथें नेऊन ठेवण्यांत आले आहेत. राजपूत, पहाडी किंवा कांगडा, मोंगल चित्रकलेकरितां राजस्थान प्रसिद्ध आहे. आणि अशा शेंकडों चित्रांचा संग्रह राजस्थानांत सर्वत्र आढळतो. मोठमोठे राजे व राण्या यांच्या छत्र्याहि आहेत. सवाई जयसिंह यानें केलेल्या यज्ञाचा शोध पुण्याचे प्रा. गोडे यांनीं 'भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूट' मध्यें सांपडलेल्या 'ईश्वरी विलास' नांवाच्या काव्याच्या आधारें केला. ती यज्ञभूमि आणि तो यज्ञस्तंभ आतां शोधून काढण्यांत आला आहे. अशोककालीन प्राचीन लेख बैराट येथील बजककी पहाडी आणि भीमजीकी डुंगरी येथें सांपडलेले आहेत. बैराट येथें स्तूप आणि विहारहि सांपडले आहेत. शेंकडों प्राचीन नाणीं तिकडे मिळालीं असून त्यांयोगें पुष्कळ नवीन माहिती प्रसिद्ध झाली आहे. राईन्ह येथें सांपडलेल्या नाण्यांचा संग्रह फार मोठा आहे. सांभर नडियासर येथेंहि नाणीं सांपडलीं आहेत. दयाराम सहानी, पुरी वगैरेंचे यावरील ग्रंथ आणि अलीकडेच सत्यप्रकाश यांनीं प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें इतिहासज्ञांना मार्गदर्शक आणि अत्यंत उपयोगी अशीं वाटतील. रणथंभोर येथें मिळालेल्या चव्हाण राजांच्या अवशेषांचें अवलोकन केल्यानें प्राचीन वैभवाची कल्पना येईल. अलीकडे हिंदुस्थान सरकारच्या पुराणवस्तुसंग्रहखात्यामार्फत डॉ. घोष यांनीं बहावलपूर संस्थानच्या सीमेपासून ते बिकानेर संस्थानांतील सुमारें शंभर-दीडशें ठिकाणीं वरवर उत्खनन करून पाहिलें आहे आणि त्यावरून मोहें-जो-दारो आणि हरप्पा येथें ज्या प्रकारचे अवशेष आढळले आहेत, त्याच प्रकारचे अवशेष सरस्वती आणि दृषद्वती नद्यांच्या खोऱ्यांतील या पट्ट्यांत आलेले आहेत. उत्खनन पुढें चालून जेव्हां खालचे थर मोकळे होतील तेव्हां पुष्कळ नवीन साहित्य या ठिकाणीं उपलब्ध होईल. तसें झाल्यास आज ज्याला 'सिंधु संस्कृति' असें म्हणतात तिचें विस्तारक्षेत्र पुष्कळच दूरवर पसरल्याचें आढळून येईल आणि 'सिंधु संस्कृति' हा शब्द टाकून द्यावा लागेल. प्राचीन संशोधनासंबंधानें आतां जागजागीं जागृति होत आहे. सरकारी आणि बिनसरकारी असे दोन्ही तऱ्हेचे प्रयत्न चालू आहेत. त्यामुळें पुष्कळ अभिनव माहिती उजेडांत येऊं लागली आहे. आणि थोड्याच वर्षांत या नवीन ज्ञानाच्या साहाय्यानें नवीन इतिहास लिहिणें प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं.

### इतिहासविषयक परिषदा

अशा राजस्थानांत यंदां भारतीय सरकारच्या अखिलभारतीय दप्तर-समितीची बैठक, त्याचप्रमाणें अखिलभारतीय इतिहासपरिषदेचें चौदावें अधिवेशन, अखिलभारतीय मुद्रापरिषदेचें आणि वस्तुशाला-(म्युझियम्)-परिषदेचें अधिवेशन—अशीं चार अधिवेशनें जयपूर येथें गेल्या १९५१ च्या डिसेंबरांत भरलीं. हिंदुस्थान-सरकारच्या राष्ट्रीय दप्तरखान्याची नवी मांडणी करून व नवें वळण लावून डॉ. सुरेन्द्रनाथ सेन हे निवृत्त झाल्या नंतर, या दप्तरखान्यावर तज्ज्ञ अधिकाऱ्याची कायमची नेमणूक सरकारकडून परवांपर्यंत झालेली नव्हती; तरीहि दप्तरखान्याचें काम व त्याची प्रगति पुष्कळ समाधानकारक होत आहे. या दप्तरखान्याला जागा अपुरी पडत आहे. कार्यकर्त्यांच्या संख्येंत वाढ झाली पाहिजे. प्रकाशनाचें कार्य मंद गतीनेंच चालू आहे. प्रतिमीकरणा-(filming)चीं वगैरे








नवीन आणलेलीं साधनें यांचा भरपूर उपयोग केला जात नाहीं. नवीन रसभरणयंत्र[1] आणवून अनेक वर्षें झालीं, पण तें अद्याप सुरू झालेलें नाहीं. अशा अनेक गोष्टी या दप्तरखान्यासंबंधीं सांगण्यासारख्या आहेत. खात्यामार्फत सरकारच्या कानावर या सर्व गोष्टी प्रतिवर्षीं घालण्यांत येतात. तथापि, या सर्व कामाला आवश्यक अशी द्रव्याची सोय आर्थिक टंचाईमुळें होत नाहीं, ही दुःखाची गोष्ट आहे.

भारतीय इतिहासपरिषदेचें अध्यक्षस्थान महाराष्ट्रांतील तपोवृद्ध आणि वयोवृद्ध रियासतकार सरदेसाई यांच्याकडे होतें.[2] मुद्रा परिषदेचें अध्यक्ष-स्थान महामहोपाध्याय प्रा. वा. वि. मिराशी या दुसऱ्या विख्यात महाराष्ट्रियांकडे होतें. पूर्व-मध्यकालीन इतिहासविभागाचें अध्यक्षस्थान पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधक-मंडळाचे श्री. ग. ह. खरे या व्यासंगी तरुण संशोधकांकडे होतें. रा. न. सरदेसाई यांनीं आपल्या भाषणांत जयपूर, कोटा वगैरे स्थळीं जें अफाट ऐतिहासिक साहित्य आहे, तें अभ्यासकांना खुलें होण्यासाठीं संघटित प्रयत्न करण्याचा कळकळीनें आग्रह केला आहे. महाराष्ट्रांतील इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचें अनुकरण करण्यासाठीं राजस्थानांतील तरुणांना त्यांनीं उपदेश केला आहे. सरदेसाई यांच्या कळकळीच्या विनंतीचा परिणाम होऊन जयपूर येथील सुप्रसिद्ध दानशूर शेठ सोहनलाल दुग्गड यांनीं पांच हजार रुपयांची देणगी त्यांच्या हवालीं केली आहे. राजे-महाराजे, ठाकूर आणि ठिकाणदार यांना अनुकूल करून घेऊन आणि त्यांना वाटणारें खरें किंवा काल्पनिक भय दूर करून जर राजस्थान-संशोधनमंडळ आणि संशोधन-आणि-वस्तुसंग्रह-शाला यांची कांहीं योजना राजस्थान विद्यापीठाच्या सहकारानें करतां आली, तर प्रगतीचा नवा मार्ग खुला होण्याचा पुष्कळ संभव आहे. मुद्रापरिषदेंत डॉ. आळतेकर व मिराशी यांनीं पुष्कळ नवी माहिती मांडली. वस्तु-शालापरिषदेंत इंग्लंडमधील प्रसिद्ध तज्ज्ञ प्रो. कॉड्रिंग्टन यांचें श्रवणीय व्याख्यान झालें. आतां निरनिराळ्या प्रदेशराज्यांत संशोधनाचीं नवीं नवीं खातीं स्थापन होत आहेत व वाढता उत्साह दिसून येत आहे. अद्याप देशी भाषांतील साहित्याकडे लक्ष कमीच आहे. डॉ. महाजनी यांच्या घरीं या परि-षदांनिमित्त जमलेल्या महाराष्ट्रीय मंडळींचा मेळावा भरला असतां, तेथें राधाबाईंच्या तीर्थयात्रेचें वर्णन सरदेसाई यांनीं केलें. त्याच संमेलनांत, मराठी ऐतिहासिक साधनांचा अभ्यास कसोशीनें करून मराठी इतिहासाचें जें विकृत दर्शन महाराष्ट्रा-बाहेर–विशेषतः राजस्थानांत इंग्रजांच्या धोरणाचा परिणाम म्हणून अद्यापिहि प्रभावी असलेलें दिसून येतें, त्याचें यथार्थ आणि साधार खंडन करण्याच्या दृष्टीनें स्वतंत्र महाराष्ट्रपरिषद् बोलावण्याची खटपट करण्याचा आपला मनोदय प्रा. न. र. फाटक यांनीं बोलून दाखविला. लवकरच तसें कांहीं घडून येईल अशी आम्हांस आशा आहे.

---

१ जीर्ण कागदांत सेल्यूलोज ॲसिटेट फॉइलचा रस भरून लॅमिनेशन पद्धतीनें कागदावर त्या द्रव्याचें कवच करणें ही यांत्रिक रसभरणपद्धति नवीन अमेरिकन पद्धति आहे.

२ रियासतकार सरदेसाई हे इतिहासपरिषदेचे चौथे महाराष्ट्रीय अध्यक्ष होत. त्यांच्या पूर्वीचे तीन महाराष्ट्रीय अध्यक्ष म्हणजे कै. रा. ब. का. ना. दीक्षित, कै. दे. रा. भांडारकर आणि म. म. दत्तो वामन पोतदार हे होत. ' नवभारता 'च्या डिसेंबर १९५१ च्या अंकांत डॉ. गो. स. सरदेसाई यांच्या-वरील आपल्या परिचयलेखांत प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर यांनीं ' महाराष्ट्रानें भारतीय इतिहासपरिषदेला चौदा वर्षांत दोन अध्यक्ष पुरविले ' अशा अर्थाचें विधान केलें होतें. तें आपलें विधान अनवधानानें केलें गेलें असें त्यांनीं कळविलें आहे. त्याप्रमाणेंच सदरील लेखांत ' फर्ग्युसन कॉलेज ' संबंधानें उल्लेखिलेला गद्रेवाडा हा बुधवारांतील पूर्वींचा गद्रेवाडा, जो नंतर किबेवाडा म्हणून प्रसिद्ध झाला, तो नसून शनिवारांतील मारुति-चौकांत न्यू इंग्लिश स्कूल ज्यांत होतें आणि आज अहिल्यादेवी मुलींची शाळा ज्यांत भरते तो गद्रेवाडा होय.—का. सं.








अखिलभारतीय दप्तर-परिषदेंत वाचण्याकरितां १९ निबंध आले होते. या परिषदेचा नियम असा आहे कीं, कांहीं तरी नवीन साहित्य अगर साधनें सांपडलीं असतील त्यांचेंच फक्त वाचन परिषदेंत होत असतें. सदरहू निबंध आणि त्यांचा सारांश इंग्रजींत छापण्यांत आले आहेत. त्याचप्रमाणें अखिल-भारतीय इतिहासपरिषदेंत अतिप्राचीन इतिहास-शाखेंत एकंदर २७, उत्तर-प्राचीन विभागांत १०, पूर्वमध्यकालीन विभागांत ३, उत्तर-मध्यकालीन विभागांत १०, आधुनिक विभागांत १७ आणि स्थानिक विभागांत २ याप्रमाणें निबंध आले होते. त्यांतील, ज्यांचे लेखक हजर होते त्यांचेच निबंध वाचून चर्चा झाली. ते सारांशरूपानें इंग्रजींत छापले आहेत. मुद्रा-परिषदेचे असेच मुद्राविषयक शोध वाचण्यांत येऊन चर्चा झाली. वस्तुशाला-परिषदेंत संग्रहालयांच्या व्यवस्थेबाबत.व प्रसाराबाबत चर्चा झाली आणि एका अभ्यासक्रमाची योजना तयार करण्याचें ठरलें.

अखिलभारतीय दप्तरखान्यामार्फत दप्तर-संरक्षणविद्येचें शिक्षण देण्यांत येतें; आणि दोन वर्षांच्या अभ्यासानंतर परीक्षा घेऊन प्रमाणपत्रहि देण्यांत येतें. इतिहास घेऊन पदवी मिळविणारास आणि संशोधनाविषयीं अभिरुचि असणारास प्रवेश मिळतो. असें हें शिक्षण देणारी हिंदुस्थानांतील ही एकमेव संस्था आहे.

रसभरणद्वारा कागदपत्रांचें संरक्षण, जाळी-दार कापडांच्या योगानें कागदांचें संरक्षण, गंध-काच्या धुरीनें कृमि आणि कृमिबीजांचा नाश, नवीन प्रतिमीकरणयंत्राच्या योगानें छायाप्रतिमारूपानें कागदांचें संरक्षण इत्यादींचे नमुने प्रतिवर्षाप्रमाणें यंदाहि प्रदर्शनांत ठेवले होते. प्रदर्शनांतील वस्तूंची दर्शिकाहि छापून प्रसिद्ध झाली आहे. उपरिनिर्दिष्ट निबंध आणि दर्शिका यांचा परामर्श घेणें स्वतंत्र लेखाचें काम होईल.

## एक परिश्रमी संशोधक

आज अनेक वर्षें सरकारी आणि बिनसरकारी दोन्ही परिषदांत एका विशिष्ट साधनाच्या आधारें टिपणें वाचण्याचा आणि प्रकाशित करण्याचा उद्योग करणाऱ्या एका परिश्रमी संशोधकांचा आणि त्यांच्याजवळील अपूर्व संग्रहाचा मुद्दाम परिचय करून देणें आवश्यक वाटतें. हे गृहस्थ म्हटले म्हणजे शिकंदराबाद येथें राहणारे श्री. के. सज्जनलाल एम्. ए. हे होत. यांच्याजवळ विशेषेंकरून उर्दू वर्तमानपत्रांचा फार मोठा भरणा आहे. शिकंदराबादेंत आम्ही त्यांच्या घरीं जाऊन तो प्रत्यक्ष पाहिला आहे. सुमारें सन १८२० ते-६० या काळांतील अनेक वर्तमानपत्रें सज्जनलाल यांच्या संग्रहांत सालवार लावून ठेवलेलीं आहेत. यंदां त्यांनीं त्यांतील कित्येक वर्तमानपत्रें प्रदर्शनांत मांडलीं होतीं. त्याशिवाय कांहीं सनदा-फर्मानां-चा संग्रहहि मांडला होता, तोहि महत्त्वाचा आहे. गोवळकोंड्याचा शेवटचा बादशहा तानाशहा यानें सन १६८३ मध्यें रामेश्वरस्वामीच्या देवळा-साठीं अन्नदान आणि दीपदानासाठीं ९० कचाल जमीन दिल्याचें एक फर्मान या संग्रहांत आहे. बहामनी काळांतील एक फारसी-मराठी फर्मानहि प्रदर्शनांत ठेवलें होतें.

## संशोधनविषयक नियतकालिकाची गरज

परिषदेंत कांहीं ठरावहि करण्यांत आले. आणि भारताचा दशखंडात्मक इतिहास प्रसिद्ध करण्याचें जें काम परिषदेनें अंगावर घेतलें आहे, त्यांपैकीं दोन खंड लवकरच प्रसिद्ध होतील असें चिटणिसांनीं जाहीर केलें, ही संतोषाची गोष्ट होय. भारत-वर्षांत जागजागीं विविध संस्था आणि त्यांचीं प्रकाशनें होत असतात. विद्यापीठांतुनहि ऐतिहासिक संशोधनाचें कार्य सुरू झालें आहे. या सर्व कार्यांची संकलित माहिती इतिहासाभ्यासकांस त्वरित एखाद्या नियतकालिकाच्याद्वारें दर तिमाहीस अगर सहामाहीस मिळत जावी, याची अत्यंत आवश्यकता आहे. तेणेंकरून सहकार वाढेल, ज्ञानांत आजतागायतपणा येईल आणि एकमेकांच्या कामाची एकमेकांस माहिती होत गेल्यामुळें त्याच विषयावर होणारे दुबार प्रयत्न वांचतील. अखिलभारतीय इतिहास परिषदेनें हें कालिकाचें काम अंगावर घ्यावें असा सर्वांचा आग्रह आहे. परंतु द्रव्यबळाच्या अभावीं परिषदेनें तें अद्याप अंगावर घेतलेलें नाहीं. या परिषदेची स्थापना १९३५ सालीं पुणें येथें झाली. त्यानंतर प्रयागनें पुढें होऊन तिच्या सातत्याचा

## इतिहासप्रसिद्ध राजस्थानचें ओझरतें दर्शन

भार आपल्या अंगावर घेतला आणि आज पंधरा वर्षे तो उत्तम प्रकारें सांभाळला. तथापि, सभासदांची संख्या २००–२५० पेक्षां जास्त होऊं शकली नाहीं, त्यामुळें अधिक कार्य अद्याप घडून आलेलें नाहीं. स्थलांतराचा उपाय लागू पडतो कीं काय हें पाहण्याच्या हेतूनें कलकत्तेकर मित्रांनीं यंदां फार उचल केली. आणि त्यामुळें वार्षिक सभेंत कांहीं खारटतुरट बोलणीं होऊन चुरशीच्या निवडणुका झाल्या. या नियामक मंडळाच्या निवडणुकींत यद्यपि फार मोठ्या बहुमतानें आमची निवड झाली असली, तरी या परिषदेची फार महनीय सेवा केलेले डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांच्यासारख्यांची निवड झाली नाहीं ही दुःखाची गोष्ट होय. या परिषदेचे प्रथमपासूनचे एक आधारस्तंभ प्रख्यात इतिहासकार दि. ब. चिदंबर श्रीनिवासाचारियर हे दिवंगत झाल्यानें परिषदेची फार मोठी हानि झाली आहे. परिषदेच्या इतिहासखंडांच्या कार्यासाठीं नेमलेले विद्वान् संपादक प्रा. नीळकंठ शास्त्री यांचें तर कोणीं नांवहि सुचविलें नाहीं. इतकें अनवधान व्हावें हें बरें नाहीं. आतां परिषदेचें कार्यालय अलाहाबादेहून कलकत्त्यास गेलें आहे. कित्येक नवीन मंडळी कार्यकारी मंडळावर आली आहेत. याचा काय परिणाम होतो तो पुढें दिसून येईल.

### स्वातंत्र्यसंग्रामाचा इतिहास

भारतीय सरकारच्या प्रोत्साहनानें भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचा इतिहास लिहिण्याचें कामहि अंगीकृत केल्याचें घोषित झालें आहे. इ. स. १८७० ते १९५० या कालखंडांत स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं अखिल भारतांत झालेल्या खटपटींचा परामर्श या इतिहासांत यावयाचा आहे. तथापि या कामाची फारशी प्रगति अद्यापि झालेली नाहीं. यासाठीं विभाग-शाखा काढून काम केलें पाहिजे. आणि तरीहि या कामासाठीं बराच काळ आणि पैसा वेंचावा लागेल. सर्व भाषांतील पत्रें, पत्रकें व ग्रंथसंग्रह या कामीं दिल्लींत एकत्रित करण्याचें योजण्यांत आलें आहे असें समजतें. हें काम आधीं आणि कसोशीनें झालें पाहिजे. निदान तेवढें जरी झालें तरी मोठेंच कार्य होईल. इतिहास मागाहून तयार झाला तरी चालेल; पण या कामीं व्यर्थ घाई होऊं देतां कामा नये, अशी दक्षता घेतली पाहिजे. नवीन संशोधन जनतेपर्यंत पोंचविण्याबद्दलहि जोराचे प्रयत्न झाले पाहिजेत. प्रदेश-सरकारें आणि प्रादेशिक विद्यापीठें यांना या कामीं फार जागृत राहिलें पाहिजे आणि आर्थिक टंचाईच्या कालांतहि या विषयाची आबाळ होऊं देतां कामा नये. अनेक साधनें अनुकूल काळाची वाट न पाहतां नष्ट होऊन जातील. मग कांहीं आपणांस त्यांचें फिरून दर्शन घडणार नाहीं. इतिहासप्रेमी जनतेनें फार जागृत राहिलें पाहिजे. धनिक लोकांचीहि मनें वळविलीं पाहिजेत. कारण हीं सर्व कामें खर्च खाणारींच आहेत.

भारताची जागृति हळूहळू कां होईना होत आहे, हें पाहून निराश होण्याचें कारण नाहीं. नव भारत आपली ही जबाबदारी पार पाडील अशी आपण आशा करूं या. नवीन पिढींत या विषयासंबंधीं अज्ञान आणि औदासीन्य माजलें असल्याचा फार मोठा प्रत्यय येतो. हा धोका टाळण्याचें काम शिक्षकांनीं केलें पाहिजे. म्हणून त्यांच्यावरील जबाबदारी त्यांनीं ओळखिली पाहिजे. अशा परिषदांना आपल्या विद्यार्थ्यांसह ते हजर राहतील, तरीहि या परिषदा भरविल्याचें उभयपक्षीं सार्थक होईल.

---

### पूर्वेकडे नजर

मानवजातीच्या धार्मिक व आत्मिक उन्नतीची आशा पूर्वेवरच खिळून राहिली आहे. विज्ञानामुळें माणसाला मोठें सामर्थ्य प्राप्त झालें, पण तो त्यावर नियंत्रण ठेवूं शकला नाहीं. जगाला शान्तता आणि मानवाला बंधुभाव यांची शिकवण देणाऱ्या महान् धर्मांचे प्रणेते पूर्वेंतच जन्मले. म्हणूनच अर्वाचीन मानव वाढती नम्रता आणि आशा बाळगून पूर्वेकडे नजर वळवीत आहे.

—डॉ. फ्रँक ग्रॅहॅम—काश्मीर-प्रकरणीं नेमलेले संयुक्त राष्ट्रसंघाचे प्रतिनिधि

—(१९५२ जानेवारीमधील अहवालांतून)








गेल्या राज्यशास्त्र-परिषदेंत चर्चिलेला एक महत्त्वाचा प्रश्न : प्रा. स. वा. कोगेकर

# राज्यशास्त्र आणि राज्यकारभार

### राज्यविषयक अभ्यासास वस्तुनिष्ठ बैठकीची आवश्यकता

राज्यशास्त्राचें अध्ययन आणि अध्यापन जरी हिंदी विद्यापीठांतून अलीकडे होत असलें, तरी देशापुढील राज्यविषयक समस्या सोडविण्याच्या कामीं त्याची फारशी मदत झालेली नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. याचें मुख्य कारण असें कीं, येथील राज्यशास्त्रविषयक अभ्यासाची उभारणी आपल्या परिस्थितीवर व अनुभवावर आतांपर्यंत तरी झालेली नाहीं. ब्रिटिशविरोधी राजकीय आंदोलनाच्या काळांत, इंग्रजी शिक्षणाच्या प्रभावाखालीं आलेल्या विचारवंतांनीं आणि पुढाऱ्यांनीं, मुख्यतः पाश्चात्त्य राजकीय कल्पना, मूल्यें आणि संस्था यांचा स्वीकार केला व त्याभोंवतीं हिंदी राजकीय भवितव्याचीं चित्रें रेखाटलीं. येथील समाजव्यवस्था, आर्थिक परिस्थिति व पारंपरिक विचारप्रणाली यांचा फारसा अभ्यास न करतां, विशिष्ट राजकीय मूल्यें मान्य आहेत एवढ्या आधारावर तीं मूल्यें व्यवहारांत आणूं पाहाणाऱ्या पाश्चात्त्य राज्यसंस्थाहि येथें उपयुक्त व कार्यक्षम होतील असें समजलें गेल्यानें, राज्यशास्त्रविषयक अभ्यासाचा सारा ओघ पाश्चात्त्य देशांच्या राज्यसंस्था आणि राज्यकल्पना यांकडे वळलेला दिसतो. नाहीं म्हणावयास, प्राचीन हिंदी राज्यविचारांकडे कांहीं अंशीं लक्ष दिलें गेलें आहे. परंतु तें कार्य मुख्यतः प्राच्यविद्यासंशोधकांनीं केलें. मात्र अशांपैकीं बहुतेकांना राज्यशास्त्राची फारशी गोडी नसल्यामुळें व या कार्याकडे राष्ट्रीय आत्मगौरवाच्या भूमिकेवरून पाहिलें गेल्यामुळें, आधुनिक राज्य-उद्योगाशास्त्राच्या अभिवृद्धीस त्याचा विशेष फायदा झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. ज्या क्षेत्रांत प्रत्यक्ष हिंदी परिस्थितीचें थोडेंबहुत विवरण करण्यांत आलें आहे असें क्षेत्र म्हणजे शासनव्यवस्थेसंबंधीं केलेल्या घटना आणि कायदे यांचें. हिंदी राज्यशास्त्रज्ञांचें मुख्य कार्यक्षेत्र आतांपर्यंत तरी एवढेंच होतें असें दिसतें. ब्रिटिश सरकार व हिंदी जनता यांमधील संबंधांचा अभ्यास बराच झाला आहे; पण तो मुख्यतः राज्यघटनात्मक दृष्टीनें आणि पाश्चात्त्य छापाच्या लोकशाही मूल्यांच्या आधारावर.

या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला आहे कीं, स्वतंत्र हिंदुस्थानांत आज ज्या राज्यविषयक समस्या आपल्यापुढें निर्माण झाल्या आहेत व नजीकच्या भविष्यकालांत ज्या निर्माण होतील, त्यांतून मार्ग काढण्यासाठीं लागणारी वैचारिक सामग्री आपणांजवळ अद्याप फारशी जमलेली नाहीं. राज्यसंस्थांची प्रत्यक्ष सामाजिक परिस्थितीशीं सांगड घालावी लागते, ही गोष्ट आपणांस आतां हळू हळू उमगूं लागली आहे. तिचा पाठपुरावा अभ्यासकांनीं केल्यास राज्यविषयक अभ्यासांत आवश्यक असणारी वस्तुनिष्ठ बैठक प्राप्त होऊन समाजाच्या प्रगतीस मदत करण्याची संधि प्राप्त होईल.

सुदैवानें ही जाणीव राज्यशास्त्राच्या अभ्यासकांना तीव्रतेनें होऊं लागली आहे. समाजांतील निरनिराळ्या विचारप्रवाहांची माहिती व्हावी, राज्यकारभारांत निर्माण होणारे प्रश्न समजावे, राजकीय हालचालींचा छडा लावता यावा, जनता, सरकार, राजकीय पक्ष आणि पुढारी यांच्यांतील परस्परसंबंधांच्या गुंतागुंतीची संगति लावतां यावी अशी आकांक्षा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली आहे. याच-








साठीं सामाजिक जीवनांत अधिक आस्थेयतेनें भाग घेण्याची इच्छाहि प्रबल झालेली आढळून येते. चालू निवडणूकींचा अभ्यास करण्याच्या दृष्टीनें राजकीय कार्यकर्त्यांस समाजांत मिसळण्याची मोकळीक हवी असते. पण ती सरकारी कॉलेजांत काम करीत असल्यानें किंवा विद्यापीठांतील विशिष्ट पक्षांच्या श्रेष्ठींचा रोष होईल म्हणून मिळणें शक्य होत नाहीं, म्हणून हळहळणाऱ्या राज्यशास्त्राच्या अभ्यासकांशीं प्रस्तुत लेखकाची नुकतीच गांठ पडलेली असल्यामुळें तर अशा पायाभूत गोष्टींसंबंधीं पुष्कळच आत्मसंशोधन होत आहे, याविषयीं शंका वाटत नाहीं.

किंबहुना डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत हैदराबाद येथें भरलेल्या राज्यशास्त्र-परिषदेच्या चौदाव्या वार्षिक अधिवेशनांत जर कोणती एक गोष्ट सर्वांच्या मनावर प्रामुख्यानें ठसली असेल, तर ती हीच कीं, राज्यशास्त्राच्या अभ्यासकांनीं यापुढें मुख्यतः हिंदी राज्यकारभारांतील प्रश्नांचा खोल अभ्यास करावयास पाहिजे व त्याच्या आधारावर जनता, सरकार व राज्यकारभारांतील प्रमुख अधिकारी यांना मार्गदर्शन केलें पाहिजे.

## मंत्री आणि तज्ज्ञ अधिकारी यांचे संबंध

परिषदेचे उद्घाटक व आपले चीनमधील वकील सरदार पणिक्कर यांनीं आज राज्यकारभारांत जे प्रश्न निर्माण झाले आहेत त्यांची रूपरेषा मांडली. त्यांच्या मतें हे प्रश्न दोन प्रकारचे आहेत : (१) एक म्हणजे प्रातिनिधिक विधिमंडळांतील पक्षबलामुळें राज्यकारभारांत अग्रभागीं असणारे मंत्री आणि राज्यकारभारांत जन्म घालविलेले तज्ज्ञ अधिकारी यांचे परस्परसंबंध कशा प्रकारचे असले म्हणजे ते सामाजिक उन्नतीस पोषक होतील ? राज्यकारभारांत तज्ज्ञ म्हटल्या जाणाऱ्यांना राजकीय कार्याचें पाठबळ नसलें तरी त्यांना मंत्रिमंडळांत घ्यावें कीं नाहीं ? सरदार पणिक्करांच्या मतें आपल्या लोकशाहीच्या सुरुवातीच्या काळांत तरी अशा प्रकारचें सहकार्य मिळविणें आवश्यक आहे. जी गोष्ट मध्यवर्ती सरकारांत घडूं शकली ती प्रांतिक सरकारांतहि घडणें शक्य व आवश्यक होतें. परंतु तसें कां झालें नाहीं ? (२) दुसरा प्रश्न पार्लमेंटरी पद्धतीची घटना येथें अंमलांत आणल्यानंतर सरकारी नोकर आणि मंत्रिमंडळ यांच्यांतील परस्परसंबंधांचा. ब्रिटिश आमदानींत रिष्ठ सरकारी नोकर हे राज्यकारभारहि चालवीत व सरकारी धोरणहि ठरवीत. पार्लमेंटरी पद्धतींत धोरण ठरविण्याचें कार्य मंत्र्यांकडे जातें; पण ही गोष्ट आपल्या देशांतील मुलकी अधिकाऱ्यांना पूर्णपणें उमगली आहे काय ? तसेंच, ब्रिटिश आमदानींत कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठीं निर्माण केलेलें राज्ययंत्र आतांच्या लोककल्याणी सरकार-( Welfare State )ची जबाबदारी पेलण्यास समर्थ आहे काय ? ज्या नव्या मूल्यांची अधिकाऱ्यांना जाणीव व्हावयास पाहिजे ती तशी झाली आहे काय ? किचकट आर्थिक व आंतरराष्ट्रीय प्रश्नांवर मंत्र्यांना सल्ला देण्याचें कार्य जुन्या जमान्यांत वाढलेले अधिकारी योग्य प्रकारें करूं शकतील काय ?— इत्यादि अनेक प्रश्न त्यांनीं उपस्थित केले व या प्रश्नांचा समाधानकारक निकाल लागल्याशिवाय राज्ययंत्र कार्यक्षम होऊं शकणार नाहीं असें प्रतिपादन केलें. या प्रश्नांचा अभ्यास करण्याची जबाबदारी राज्यशास्त्रज्ञांनीं उचलली पाहिजे. तसेंच, सबंध समाज हें आपलें कार्यक्षेत्र मानून राजकीय संबंधांचा सांगोपांग अभ्यास त्यांनीं केला पाहिजे असेंहि त्यांनीं सांगितलें. यासाठीं एक संस्था स्थापन करण्याच्या कल्पनेचाहि त्यांनीं उल्लेख केला. अशा संस्थेंत राज्यशास्त्रज्ञ तर असावेतच, पण त्याशिवाय अनुभवी अधिकारी, राजकीय पुढारी, आर्थिक क्षेत्रांतील लोक, तसेंच मजूरपुढारी यांचाहि समावेश व्हावा. राजकीय प्रश्नांचा अभ्यास एकट्या-दुकट्यानें आपल्या खोलींत बसून करण्यासारखा नाहीं. त्यास विचारसहकार्य लागतें व निरनिराळ्या क्षेत्रांतील लोकांनीं तें दिलें पाहिजे असेंहि त्यांनीं प्रतिपादिलें. बदलत्या काळाबरोबर समाजाच्या आचार-विचारांत योग्य ते बदल घडवून आणण्याचें कार्य लोकशाहीप्रधान देशांत अशा संस्थाच करीत असतात यावर त्यांनीं विशेष जोर दिला.

## गोरवाला-अहवालांवर चर्चा

योगायोग असा कीं, या परिषदेंत राज्यकारभार-विषयक प्रश्नांची चर्चा व्हावी म्हणून गतवर्षींच त्या दृष्टीनें विषयांची निवड करण्यांत आली होती. एवढेंच नव्हे तर राष्ट्रीय नियोजन-समितीचे








राज्यकारभारविषयक सल्लागार श्री. गोरवाला यांना परिषदेचें आमंत्रण मुद्दाम देण्यांत येऊन त्यांनीं तें स्वीकारलेंहि होतें. प्रत्यक्ष राज्यकारभारांत भाग घेतलेल्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें परिषदेच्या चर्चेत भाग घेण्याचें हें पहिलेंच उदाहरण होतें. बदललेल्या काळाची निदर्शक अशीच ही घटना होती. राज्यशास्त्राच्या अभ्यासकांच्या दृष्टीनें गत-वर्षीं राज्यकारभाराच्या क्षेत्रांत घडलेली उल्लेखनीय गोष्ट म्हणजे श्री. गोरवाला यांनीं सादर केलेले दोन अहवाल ही होय. आणि या विषयावरील चर्चे-साठीं आलेल्या बहुतेक सर्व निबंधांत कोणत्या ना कोणत्या संदर्भात या अहवालांचा उल्लेख कमी-अधिक प्रमाणांत करण्यांत आला होता.

श्री. गोरवाला यांनीं सादर केलेल्या एका अहवालांत, राष्ट्रीय नियोजन-समितीच्या योजनेंत बसणाऱ्या सरकारच्या औद्योगिक स्वरूपाच्या कार्या-साठीं कशा प्रकारची यंत्रणा अस्तित्वांत आणावी, यासंबंधीं सूचना करण्यांत आल्या आहेत. दुसऱ्यांत, आजच्या राज्यकारभाराच्या यंत्रणेविषयीं ती अधिक कार्यक्षम होण्यासाठीं सर्वसाधारण सूचना करण्यांत आल्या आहेत. आपल्या भावी राज्यकारभाराची घडण ठरविण्याच्या दृष्टीनें हे दोनहि अहवाल महत्त्वाचे असल्यामुळें त्यांकडे राज्यशास्त्राच्या अभ्यासकांचें लक्ष जाणें साहजिक होतें. विशेषतः स्वातंत्र्योत्तर कालांत सरकारी कचेऱ्यांतून वाढलेल्या लांचलुचपत, वशिलेबाजी वगैरे दुर्गुणांवर तोडगा म्हणून कांहीं सूचना या अहवालांत असल्यामुळें त्यांच्या उपयुक्ततेबद्दल साधकबाधक चर्चा होणें स्वाभाविक होतें. याच चर्चेत सरदार पणिक्करांनींहि भाग घेतल्यामुळें व कांहीं मूलभूत मुद्दे उपस्थित केल्यामुळें ती पुष्कळच उद्बोधक झाली. राज्य-शास्त्राच्या अभ्यासकांच्या विचारसरणींतील कांहीं दोषांवर तिनें प्रकाश पाडल्यामुळें तर तिचें महत्त्व विशेष वाटलें.

## उद्दिष्ट नवीन पण राज्ययंत्र जुनें

हिंदी राज्यकारभाराची घडी ब्रिटिश आमदानींत जशी होती तशीच आजहि आहे. राज्यकारभाराच्या उद्दिष्टांत मात्र फरक झालेला आहे. कर वसूल करणें आणि शांतता टिकविणें हीं ब्रिटिश राजवटीचीं उद्दिष्टें होतीं. ‘ लोककल्याणकारी ’ असें राज्यकारभाराचें उद्दिष्ट स्वातंत्र्योत्तर कालांत बनूं लागलें आहे. या उद्दिष्टाच्या साधनेला पूर्वीच्या जमान्यांतील राज्ययंत्र कितपत उपयुक्त होईल ? श्री. गोरवाला यांच्या अहवालाचा सारा भर राज्यांतील अधिकारी वर्गाची नैतिक पातळी वाढविण्यावर आहे. पण पूर्वीच्याच पद्धतीनें विचार करणारा नीतिमान् अधिकारी आजच्या काळांत यशस्वी होईल काय ? यासाठीं अधिकारी वर्गाचीं मूल्यें, त्याची विचारसरणी, लोकांकडे, मंत्र्यांकडे आणि प्रातिनिधिक संस्थांकडे पाहाण्याचा दृष्टिकोन यांत बदल आवश्यक नाहीं काय ? तसा बदल केवळ नीतिपाठ देऊन घडून येईल काय ? इत्यादि मूलभूत मुद्दे चर्चेत पुढें आले. केवळ ब्रिटिश राज्यव्यवस्थेचें अंधानुकरण करून भागणार नाहीं, हा मुद्दा सरदार पणिक्करांनीं प्रामुख्यानें पुढें मांडला. याचें मुख्य कारण जिल्हानिहाय राज्यकारभाराचें बहु-केंद्रीकरण ( विकेंद्रीकरण नव्हे ) ही आपल्या देशांतील विशिष्ट पद्धति ब्रिटनमध्यें अस्तित्वांत नाहीं. तेथील सरकारचा कारभार मुख्यतः एककेंद्रीय पद्धतीचा आहे. जिल्हानिहाय सरकारी अधिकारी वर्ग तेथें नाहीं. तसेंच, जमिनीचा सारा वसूल करणें आणि जमिनीसंबंधीं हक्क-वहिवाट इत्यादींवर नियंत्रण ठेवणें या मध्यबिंदूच्या भोंवतीं आपलें राज्ययंत्र फिरत आलें आहे, तशी परिस्थिति ब्रिटनमध्यें नाहीं. जिल्हाधिकारी हे आपल्याकडे केवळ सरकारचे हस्तक किंवा हुकुमाचे ताबेदार नसून आजपावेतों सरकारचें धोरण बनविण्याची जबाबदारीहि त्यांच्यावर असे. आज जिल्ह्याच्या कारभारांतील धुरीणत्व त्यांकडे कायम असलें, तरी धोरण बनविण्याची सत्ता प्रातिनिधिक संस्था व त्यांचे पुढारी यांच्या हातीं गेली आहे. त्यामुळें पूर्वीच्या चौकटींत वाढलेल्या अधिकाऱ्यांना नव्या जमान्याशीं एकरूप होणें कठिण जातें. अर्थात् त्याचा परिणाम राज्य-यंत्राच्या कार्यक्षमतेवर झाल्यास नवल नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं सर्व दोष अधिकारी वर्गावर टाकतां येईल. मंत्री, आमदार, पक्षपुढारी आणि जनता यांनाहि आपापल्या मर्यादांचें शिक्षण अजून मिळालेलें नाहीं, ही गोष्ट नाकबूल करतां येत

नाहीं. परंतु श्री. गोरवाला यांना अधिकारी वर्गाच्या भूमिकेविषयीं व दृष्टिकोनाविषयीं जितकी खात्री आहे तितकी ती सार्वत्रिक नाहीं एवढें निश्चित.

राज्यकारभारांत अ-कार्यक्षमता, लांचलुचपत, वशिलेबाजी वाढत आहे याचें गमक काय, असा कांहींसा तात्त्विक मुद्दाहि पुढें येतो. ब्रिटिश आमदानींत हे दोष नव्हते काय ? अलीकडे ते वाढत आहेत असें निश्चितपणें म्हणतांना त्यांचें मूळ मंत्री, आमदार वगैरे नव्यानें सत्ताधारी झालेल्या नेत्यांच्या वागणुकींत, धोरणांत आणि निर्णयांत सांपडतें कीं, अधिकारी वर्गाच्या मोहांत ? पण या प्रश्नांचें कांटेकोर उत्तर देणें कठिण आहे. अधिकाऱ्यांची लांचलुचपतीची प्रवृत्ति सिद्ध करून दाखवावयाची म्हणजे न्यायालयाचा एकच मार्ग दृष्टीपुढें येतो. परंतु या प्रकारचा प्रत्येक अपराध न्यायालयांत शाबीत होईलच असें नाहीं. शिवाय साक्षी मिळविणें वगैरे गोष्टी वाटतात तितक्या सोप्या नसल्यामुळें, न्यायालयीन चौकशी व निकाल हें गमक लावल्यास, राज्यकारभारांत फारच अल्प प्रमाणांत हे दोष आहेत असें म्हणावें लागेल. पण तसें असल्यास त्यासंबंधीं इतका गवगवा होता ना ! अ-कार्यक्षमतेबाबत तर असें म्हणतां येईल कीं, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर वरिष्ठ अधिकाऱ्यांपैकीं, निम्मे अधिक अधिकारी सेवानिवृत्त झाल्यामुळें व नवनव्या नियंत्रणाच्या जबाबदाऱ्या नवख्या अधिकाऱ्यांवर पडल्यामुळें कार्यक्षमतेंत घट न होती, तरच आश्चर्य ! ही स्थिति सुधारणार कशी ? असा प्रश्न सहजच पुढें येतो. योग्य माणसाची निवड, त्याला शिक्षणाची जोड, चांगल्या कामाबद्दल शाबासकी, चुकीबद्दल शासन, जबाबदारी उचलण्यास प्रोत्साहन व नंतर पाठिंबा इत्यादि गोष्टी सर्वमान्य आहेत. त्या प्रत्यक्षांत आणण्यासाठीं कांहीं किरकोळ सूचना करण्यापलीकडे फारसें अजून निष्पन्न झालेलें नाहीं. सरकारी धोरणाची निर्दोष रचना आणि त्या धोरणाशीं एकरूप होणारा अधिकारी वर्ग अशी परिस्थिति निर्माण होणें हा मुख्य प्रश्न आहे. त्या दृष्टीनें धोरण ठरविणारे आणि त्याचा अंमल करणारे या दोघांनाहि आपली उच्च परंपरा अजून निर्माण करावयाची आहे हेंच खरें.

### राज्यकारभारविषयक कल्पनांतील गोंधळ

आपल्या अधिकारी वर्गापासून आपण दोन कांहींशा परस्परविरोधी गोष्टींची अपेक्षा करतों, असेंहि अलीकडील यासंबंधींच्या चर्चेवरून वाटूं लागतें. पार्लमेंटरी पद्धतीच्या कारभारांत धोरणाची जबाबदारी लोकप्रतिनिधींवर असेल तर लोकांचें नेतृत्व करण्याची जबाबदारीहि त्यांजकडेच जाते. या दृष्टीनें अधिकारी वर्गाचें स्थान दुय्यम प्रतीचें आहे. सरकारी धोरण हुकुमाप्रमाणें पार पाडणें हें त्यांचें काम. या धोरणास जनतेचा पाठिंबा मिळवून देण्याचें काम लोकनेत्यांचें. पूर्वी हीं दोन्ही कामें अधिकारी वर्गावरच पडत असत आणि त्या दृष्टीनें त्यांना सत्ताहि मोठी असे. पण जरी पार्लमेंटरी पद्धतीचा आपण अवलंब केला असला, तरी जनतेला कार्यप्रवृत्त करण्याची अपेक्षाहि आपण अधिकारी वर्गापासून करतों. ही अपेक्षा पूर्ण करण्यासाठीं कित्येक वेळां अधिकारी विशिष्ट लोकनेत्यांच्या संपूर्णपणें आहारीं जातात आणि त्याचा परिणाम त्यांच्या कारभारांतील निर्णयांवर झाल्याशिवाय राहत नाहीं. हा प्रकार म्हणजे आपण होऊन वशिलेबाजीला आमंत्रण देण्यासारखा आहे. त्यामुळें अर्थातच जनतेला अधिकारी वर्गाच्या न्यायनिवाड्याबद्दल विश्वास वाटेनासा होतो. तसें झालें कीं लगेच आपण दुसऱ्या टोंकाला जातों आणि म्हणतों कीं, ज्या प्रांतांतला अधिकारी त्या प्रांतांत ठेवतांच उपयोगी नाहीं ! श्री. गोरवाला यांनीं आपल्या राज्यकारभाराविषयक अहवालांतहि या कल्पनेचा पाठपुरावा केला आहे, याचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. पूर्वीच्या जमान्यांत भोंवतालच्या परिस्थितीपासून अधिकारी जितका अलिप्त राही तितका त्याचा लौकिक मोठा असे. निःस्पृह बाण्यानें आपणांस योग्य दिसेल तें करावयाचें अशा वृत्तीचे अधिकारी त्या वेळीं दिसून येत. परदेशांतला साहेब जेथें जिल्हाधिकारी होऊन चाले, तेथें परप्रांतांतला हिंदी माणूस आल्यानें कांहीं बिघडण्याचें कारण नव्हतें. ब्रिटिश राजवटीचें धोरण लोकांच्या सामाजिक वा आर्थिक जीवनांत प्रत्यक्षपणें हस्तक्षेप करण्याचें किंवा अमुक गोष्ट लोकांच्या पाठिंब्यावर घडवून आणण्याचें नव्हतेंच. त्यामुळें तिऱ्हाईत अधिकारीहि कार्यक्षम ठरे. पण आज








ती परिस्थिति राहिली नाहीं. सरकार हें लोकांचें प्रातिनिधिक झालें आहे, जनतेच्या आशा-आकांक्षा पूर्ण करण्याची जबाबदारी त्यावर पडलेली आहे. अशा वेळीं अधिकारी आणि जनता यांच्या सहकार्याचें महत्त्व अर्थातच फार आहे. तत्त्व म्हणून सरसकट बंगाली अधिकारी पंजाबांत, पंजाबी अधिकारी मुंबईत, मद्रासी अधिकारी बंगालांत अशी विभागणी सुरू झाल्यावर हें सहकार्य मिळवतां येईल काय, असा प्रश्न आहे. 'निःस्पृह अधिकारी' असें चित्र डोळ्यांपुढें ठेवतांना आपण या कल्पनेचा पाठपुरावा करतों; जनतेचें सहकार्य संपादन करण्याच्या कामीं हे अधिकारी उपयुक्त होणार नाहींत हा विचार त्याच वेळीं आपल्या मनांत येत नाहीं. जेव्हां तो विचार आपल्यापुढें येतो तेव्हां लोकांच्या विश्वासाला पात्र ठरलेले असे लोक-पुढारीहि त्या त्या भागांत अधिकाराच्या जागीं नेमण्याची कल्पना आपल्याला स्वागतार्ह वाटते! राज्यकारभारांतच नव्हे तर राज्यकारभारविषयक कल्पनांतहि तितकाच गोंधळ आहे!

या प्रश्नांकडे आपल्या विचारवंतांचें लक्ष वेधलें जाऊं लागलें आहे ही गोष्ट मात्र स्वागतार्ह म्हटली पाहिजे. हिंदुस्थानसारख्या देशांत राज्य-कारभारास जें महत्त्व आहे तसें तें इतरत्र दिसून येतेंच असें नाहीं. कारण आपल्या भावी आर्थिक व सामाजिक उन्नतीची सारी भिस्त राज्यकारभारावर आहे. व्यक्तिगत प्रगतीची शक्यता येथें फारच अल्प असल्यामुळें सामुदायिक कार्यावरच सामाजिक उन्नतीचें यशापयश अवलंबून आहे. या कार्याची जबाबदारी अर्थातच जनतेच्या प्रातिनिधिक सरकारवर पडते. राज्ययंत्र हें सरकारच्या हातांतील एक प्रभावी साधन आहे. तें जितकें कार्यक्षम तितकें समाजहिताचें साध्य अधिक सुकर. तेव्हां या राज्ययंत्राच्या रचनेकडे, कार्याकडे आणि कार्य-क्षमतेकडे अधिकाधिक लक्ष देणें अगत्याचें मानलें पाहिजे. हिंदी राज्यशास्त्रज्ञांना ही जाणीव झाली आहे ही समाधानाची गोष्ट आहे. हैदराबादला भर-लेल्या राज्यशास्त्र-परिषदेनें या विषयाला चालना देण्याचें कार्य केलें हेंहि योग्यच झालें.

---

## कशाला मी तुझ्यासंगें?

बाळे! पांखरासारखी
आनंदाचे बिसतन्तु
हातीं धरुनी मलाहि
संथ सरितेच्या पायीं
विचारांत नादावून
विचारिशी 'सांग दुजें
काय करायचें आतां?
शतदंश वेदनांचे
एक चित्तांत चितावें
लपवीत ओढाताण
जाणूनीही दंभ सारा
सांग कसे वहावेत
तुझ्या भाबड्या आनंदीं
कशाला मी तुझ्यासंगें?
दुरूनीच बघूं दे ग
आस 'सन्तत लाभावें

गाशी उडशी नाचशी
दोहीं हातीं उधळिशी
तुझ्यासंगें नाचविशी
चाल बोलके बांधिशी
चाल माझी मंदावतां
काय करूं या ग आतां?'
मला कांहींच सुचेना
पोखरिती माझ्या मना!
पुढें दुजेंच ठाकावें
त्याचें स्वागत करावें
खेळ खेळावा हांसत
चित्तीं स्रोत अंतःस्फूर्त?
जरा विसरतें सारें
सुमासंगें विष-वारें
तुझें नाचणें उडणें
तुला असेंच पहाणें!'

—शान्ता कुळकर्णी








# सार संकलन

## अवनींद्रनाथ टागोर

सुप्रसिद्ध कलागुरु अवनीन्द्रनाथ टागोर नुकतेच दिवंगत झाले. त्यांच्यावर ' संस्कृति ' या मासिकाच्या जानेवारीच्या अंकांत श्री. उमाशंकर जोषी ( संपादक ) यांनीं एक लेख लिहिलेला आहे. अवनीन्द्रनाथांचें कलाक्षेत्रांतील प्रभुत्व स्वतःसिद्ध होतें. त्यांचा भारतीय कलाविश्वांतील अधिकार सर्वांना मान्यच होता. पण त्यांचीं शेवटचीं वर्षें फार हलाखीचीं गेलीं. आपलीं चित्रें अमेरिकन धनिक विकत मागत असतां आपल्या देशांतील लोकांना तीं उपलब्ध राहावींत, म्हणून त्यांनीं या देशांतील धनिकांनाच तीं विकलीं. पण तीं त्या धनिकांच्या इतर खासगी मालमत्तेप्रमाणेंच जनतेच्या नजरेआड झालीं. ही घटना फारच विषादपूर्ण होय. तिचाच उल्लेख श्री. उमाशंकर जोषी यांनीं लेखाच्या शेवटीं केलेला आहे. अहमदाबाद किंवा इतर शहरांतील धनिकांनीं तीं चित्रें सर्वांना दिसावींत अशी व्यवस्था करणें त्यांना भूषणावह होणार आहे.—श्री. जोषी यांच्या लेखांतून पुढील भाग घेतला आहे :

" भारताचें वाङ्मयचैतन्य रवीन्द्रनाथांच्या रचनांच्या द्वारें प्रकट झालें, तसें त्याचें कलाचैतन्य अवनीन्द्रनाथांच्या चित्रांच्या द्वारें प्रकट झालें असें म्हणतां येईल. सुरुवातीला त्यांची चित्रसाधना युरोपीय चित्रकलेच्या प्रभावाखालीं चालू होती. रविवर्म्यांच्या, पौराणिक प्रसंगांवरील आणि कोणतेंहि आंतर रहस्य नसलेल्या, भारतीय वेष पण पाश्चात्त्य शैली यांच्या केवळ अनुकरणासारख्या, चित्रांचें तें युग होतें. हळूहळू अवनीन्द्रनाथांची कलाप्रवृत्ति खऱ्या अनुभूतीच्या मार्गाकडे वळली. भारतांतील युगोयुगींच्या कलासाधनेच्या संपर्कात ते अधिकाधिक येऊं लागले. अजंठ्याची चित्रसंपत्ति, भुवनेश्वर व कोणार्क येथील शिल्पस्थापत्याची संतोषदायी सिद्धि, बृहत्तर भारतांत पसरलेली वरभूधर ( बोरोबुदुर ) याची शिल्पकला या सर्वांतून त्यांनीं प्रेरणा मिळविली आणि आपल्या कलाप्रवृत्तीचें स्वरूपच बदललें. अर्वाचीन चित्रकलेनें पुनर्जीवन अनुभवलें. खऱ्या अर्थानें जिला भारतीय म्हणतां येईल अशा चित्रशैलीचा जन्म झाला आणि तिच्याकडे पाश्चात्त्य कलावेत्तेहि सन्मानपूर्वक पाहूं लागले.

" जणुं कांहीं भारताच्या हृदयांत कलम बुडवूनच अवनीन्द्रनाथ एकामागून एक उत्तम कलाकृति निर्माण करूं लागले. रजपूत शैली असो, पहाडी कलम असो किंवा अजंठ्याची ढब असो, त्यांच्या रचनेंतून प्रत्येक प्रकारची कला सजीव रूपानें, प्राणांच्या हुंकारानें भरलेली अशी बाहेर पडते. त्यांचें निसर्गाचें दर्शनहि खरें आणि हृदयस्पर्शी असतें. झाडाच्या मागून चाललेला मोर असो किंवा मजल दरमजल चालून थकलेला, सामान वाहणारा उंट असो, आग्रा किल्ल्यांतून ताजमहालाचें अस्फुट दर्शन घेणारा शहाजहान असो किंवा दाराचें मस्तक तपाशीत बसलेला औरंगजेब असो, अवनीन्द्रनाथांची कला सारखीच उच्च कक्षेवरून विहार करीत असते. दोन वर्षांपूर्वीं पाहिलेलीं दोन चित्रें मी कधींहि विसरणार नाहीं. एक म्हणजे दोन्ही हात पाठीमागें घेऊन—एकांत तलवार व दुसऱ्यांत कुराण घेऊन—उभा असलेल्या औरंगजेबाच्या भव्य आकृतीचें रेखाचित्र. फक्त रेखाचित्र ! एवढ्या थोड्या कृतींतून एवढा भव्य परिणाम कलाकारांनीं क्वचितच साधलेला असेल ! दुसरें एक मोठें चित्र म्हणजे टागोर आणि गांधीजी व त्यांची भेट करविणारे दीनबंधु ॲन्ड्रयूज, या तीन महापुरुषांचें होय. ॲन्ड्रयूज या दोघांची भेट घडवून आणून डाव्या

बाजूच्या टोंकाला शांतपणें साक्षिरूपानें बसले आहेत. एका पायाच्या गुडघ्याला हातानें पकडून संकोचून बसलेली काटकुळीशी वेदनेच्या साक्षात् मूर्तीसारखी, गांधीजींची बारिकशी आकृति चित्रफलकाच्या मधोमध आहे आणि उजव्या टोंकाला, गांधीजींच्या दर्शनानें देशांतील विषमतेचाच साक्षात्कार झाल्यागत चिंतामग्न झालेल्या गुरुदेवांची भव्यसुंदर मूर्ति ! अवनीन्द्रनाथांच्या चित्रकलेंत अनेक ठिकाणीं ' भूमा 'चा स्पर्श जाणवतो.

" अवनीन्द्रनाथ एक उत्तम लेखकहि होते. चित्रकलेच्या षडंगांविषयीं द्योतक असें लिखाण त्यांनीं लिहिलें हें स्वाभाविक होय. पण मार्मिक गद्यलेख, ' आपन-कथा ' हें आत्मचरित्र वगैरेहि त्यांनीं लिहिलें आहे. चांगल्या शिशुकथांची उणीव पाहून त्यांनीं ' राजकाहिनी ' वगैरे बालकथाहि लिहिल्या आहेत. आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत ते भिंतीवरील खाणाखुणांतून आकार प्रकट करीत आणि लाकडाच्या पडलेल्या तुकड्यांतून मगर, बेडूक किंवा असेच आकार पाहून घेऊन, घासपूस करून त्यांतून सूचक आकार तयार करून नवीं कलाक्रीडनकें ( खेळणीं ) निर्माण करीत. अनेक मार्ग शोधणाऱ्या त्यांच्या कलासिसृक्षेचेंहि हें उदाहरण आहे. "

## दक्षिण आफ्रिकेंतील वर्णभेदाचें धोरण

दक्षिण आफ्रिकेंत डॉ. मलान यांच्या सरकारनें वर्णभेदावर आधारलेली घटना अंमलांत आणली आहे. नुकताच एक कायदा करून त्यांनीं बिन-युरोपियन अशा बहुसंख्य लोकांना $\frac{1}{3}$ पेक्षां कमी जागा दर शहरीं ठेवली आहे. महत्त्वाचे मोहल्ले व पेठा युरोपियनांकडे जाणार आहेत व तेथून हिंदी लोकांची उचलबांगडी होणार आहे. या वर्णभेदाविरुद्ध युनोमध्यें ठराव झाले असूनहि मलान सरकारनें आपला हट्ट तसाच चालविला आहे. महात्माजींचे चिरंजीव श्री. मणिलाल गांधी हे आपल्या वडिलांप्रमाणेंच आफ्रिकेंतील अन्यायाविरुद्ध निःशस्त्र प्रतिकाराचा व सत्याग्रहाचा प्रयोग एकटेच करीत आहेत. अशा वेळीं या धोरणाची सामान्य माहिती प्रसंगोचितच होईल. डिसेंबर २३ च्या ' टाईम्स् ऑफ् इन्डिया ' मध्यें पी. पी. बलसारा यांचा यासंबंधीं महत्त्वाचा लेख आला आहे. त्यावरून पुढील माहिती एकत्र केली आहे :

" दक्षिण आफ्रिका या देशाची लोकसंख्या सुमारें ११ दशलक्ष आहे व त्यांतील ७० टक्के लोक नेटिव्ह् किंवा तद्देशीय आहेत; २० टक्के युरोपियन असून त्यांत डचांची संख्या ब्रिटिशांपेक्षां थोडी जास्त आहे; ७ टक्के कलर्ड लोक किंवा ' काले आदमी ' आहेत; आणि २॥ टक्के हिंदी लोक आहेत. ' काले आदमी ' म्हणजे डच-युरोपियन पुरुषांपासून तद्देशीय किंवा मलायन गुलाम स्त्रियांना झालेली संतति होय; त्यांची वसति मुख्यतः केप प्रांतांत आहे.

" दक्षिण आफ्रिका खनिज संपत्तीच्या बाबतींत अत्यंत समृद्ध आहे. जगांतील अर्धें सोनें येथल्या खाणींत उत्पन्न होतें; सर्वांत जास्त हिरे येथें निघतात; शिवाय येथें कोळसा, ॲस्बेस्टॉस, तांबें, जस्त आणि प्लॅटिनम यांचे थर आहेत; जगांतील पांच मोठ्या लोंकरीच्या उत्पादक राष्ट्रांपैकीं तें एक आहे; आणि तेथल्या हवापाण्यामुळें तेथें लागवडहि मोठ्या प्रमाणावर होते. तेव्हां अशा समृद्ध प्रदेशाची सत्ता आपल्या हातीं असावी व इतर प्रतिस्पर्ध्यांना हुसकून लावावें अशी इच्छा युरोपियनांच्या मनांत येणें स्वाभाविकच होय. त्याप्रमाणें त्यांचा प्रयत्न सतत चालू आहे. ट्रान्सव्हालच्या डच राज्यघटनेंत पूर्वींच असें नमूद केलेलें आहे कीं, " काळे व गोरे यांमध्यें धर्म किंवा राज्य यासंबंधांत समता राहणारच नाहीं. " जनरल स्मट्ससारखे उदारमतवादी नेते झाले तरी एकंदरींत हें धोरण चालूच राहिलें व आतां तर ह्या वर्णभेदावरच आधारलेला कायदा—The Group Areas Act—झाला आहे. व्हान् रीबेकच्या कारकीर्दीपासून सुरू झालेलें हें धोरण नंतरच्या सर्व सरकारांनीं मान्य केलें तरी त्याची अंमलबजावणी करणें कठिण होऊन बसलें होतें. पण आतां मलान यांच्या सरकारनें चंग बांधलेला दिसतो.

" या विभक्तीकरणा-( segregation ) च्या धोरणामुळें ७० टक्के नेटिव्ह लोकांना एकंदर जमिनीचा फक्त १३ वा हिस्सा राहावयास मिळणार आहे, त्या जागांना reserves असें








नांव दिलेलें आहे. आतां या नव्या कायद्यानें ह्या जागांतील उत्तम भागहि युरोपियनांकडे जाणार आहे व बिनयुरोपियन लोक हळूहळू पडीक प्रदेशांत हाकलले जाऊन त्यांचें अस्तित्व नामशेष होणार आहे. सर्व देशाचे युरोपियन किंवा गोरा विभाग व बिनयुरोपियन किंवा काळा विभाग असे भाग पाडले जाऊन युरोपियनविभागांत राहण्याला बाकीच्यांना एकाच अटीवर परवानगी मिळणार आहे.—ते युरोपियनांकडे नोकरीला तरी असावेत किंवा त्यांच्या हिताकरिता तरी तेथें राहात असावेत.

" हिंदी लोक प्रथम गेल्या शतकाच्या मध्यकालांत तेथें युरोपियनांच्या आमंत्रणावरून गेले आणि जमिनीच्या लागवडींत युरोपियनांना त्यांनीं मदत केली. पुढें अधिकाधिक हिंदी तेथें जाऊन राहूं लागले आणि व्यापारांत युरोपियनांशीं स्पर्धा करूं लागले. ट्रान्सव्हालमध्यें १८८५ मध्यें प्रथम हिंदी लोकांचें विभक्तीकरण करण्यांत आलें. नंतर पहिल्या महायुद्धानंतर गरीब गोऱ्यांची संख्या वाढल्यामुळें हिंदी लोकांना हुसकावण्याचा डाव रचण्यांत आला व १९२५ सालीं युनियन सरकारनें Class Areas Bill आणलें. पण तेव्हां हिंदी सरकारनें लक्ष घालून करार घडवून आणला व त्यामुळें बिल पास करण्यांत आलें नाहीं. परंतु हिंदी लोक आपण होऊन आफ्रिका सोडून जाईनात तेव्हां १९४३ सालीं Pegging Act केला गेला. मग १९४६ सालीं Asiatic Land Tenure and Representation Act झाला व शेवटीं १९५० सालीं Group Areas Act झाला.

" नेटिव्हांचें विभक्तीकरण तर फार पूर्वीच झालेलें होतें, पण या ' ग्रूप एरिआ ' कायद्यानें हिंदी व ' कलर्ड ' लोकांनाहि त्यांत ओढलें आहे. त्यामुळें त्यांना आपलीं मूळचीं घरें सोडावीं लागणार, व्यापाराचे मोहल्ले सोडावे लागणार आणि गोऱ्या हद्दींतील मालमत्ता किंवा जमीनजुमला यांच्या मालकीवरहि गदा येण्याचा संभव आहे.

" पण या विलगीकरणाचा एक परिणाम असा झाला आहे कीं, त्यामुळें ' नेटिव्ह ' जनतेंत साम्यवादाचें वारें खेळूं लागलें आहे व दक्षिण आफ्रिकन सरकारपुढें तोच एक मोठा बिकट प्रश्न उभा आहे.

" या विभक्तीकरणाची सांथ आफ्रिकेंतील इतर विभागांत पसरत आहे. ऱ्होडेशिया व केनिया या ब्रिटिश वसाहतींत याचें प्रत्यंतर येत आहे. डचांनीं हें धोरण स्वीकारलें याचें कारण त्यांना उदारमतवादी दृष्टि नाहीं. पण ब्रिटिशांची कारवाई मात्र, आफ्रिका फक्त गोऱ्यांसाठींच राखीव कुरण बनवावें, यासाठीं निश्चित आहे.

केनियामध्यें ब्रिटिश सत्ताधाऱ्यांनीं ' फोडा व झोडा ' ही नीति स्वीकारली असून हिंदुस्थानप्रमाणेंच तेथें हिंदु व मुस्लिम यांसाठीं विभक्त-मतदारसंघ ठरविण्यांत आले आहेत. त्यांचें म्हणणें जरी असें असलें की, ते केवळ तात्पुरते आहेत तरी त्यांमागील मनोवृत्तीचा निदान हिंदुस्थानला तरी पुरेपूर अनुभव आलेला आहे !

" पूर्वेकडील आपलें महत्त्व अस्तंगत होत आहेसें पाहून गोऱ्यांनीं आपलें प्रस्थ आफ्रिकेंत स्थिर करण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला आहे. त्यांना आफ्रिका फक्त गोऱ्यांच्या वसाहतीसाठीं पाहिजे आहे. परंतु मध्य-पूर्वेस नुकत्याच घडलेल्या घटनांनीं तरी या शोषणकर्त्या राष्ट्रांनीं धडा घेतला पाहिजे."

## युगोस्लाव्हिआंतील ' मार्क्सवादी ' विचारांची दिशा

मुंबईच्या ' नवशक्ति ' या दैनिकाचे संपादक श्री. प्रभाकर पाध्ये हे नुकतेच युगोस्लाव्हिआला जाऊन आले. सोव्हिएट रशियाच्या पोलादी पडद्याआड जायचें नाकारणारा म्हणून मार्शल टिटोचा युगोस्लाव्हिआ हा सुप्रसिद्ध असून तेथील मार्क्सवादी विचारांच्या प्रगतीकडे साहजिकच जगांतील विचारवंतांचे डोळे लागले आहेत. श्री. प्रभाकर पाध्ये यांना जें युगोस्लाव्हिआंतील वैचारिक वातावरण आढळून आलें त्याचें दिग्दर्शन त्यांनीं मुंबईच्या ' रचना ' या द्वैमासिकाच्या ताज्या जानेवारी १९५२ च्या अंकांतील आपल्या लेखांत केलें आहे. त्या लेखांतील कांहीं विचार सारांश रूपानें पुढें दिले आहेत :

" युगोस्लाव्हिआंतील कम्युनिस्ट पक्ष स्टालिन-








वादाच्या पावलावर पाऊल ठेवून जात होता. पण स्टालिनशाहीशीं त्याचा बेबनाव झाल्यानंतर जगाकडे आणि समाजवादाकडे तो नवीन दृष्टीनें पाहूं लागला. नवदृष्टीनें पाहण्याच्या या धैर्यशाली प्रयत्नांतून युगोस्लाव्हिआंत एक नवें तत्त्वज्ञान जन्माला येत आहे. या तत्त्वज्ञानाचा विकेंद्रीकरणावर भर आहे. राज्यकारभाराची उभारणी विकेंद्रीकरणावर झाली पाहिजे असें युगोस्लाव्हिआचे कम्युनिस्ट नेते आतां आग्रहानें प्रतिपादीत आहेत. राज्यकारभाराच्या विकेंद्रीकरणाची उभारणी उद्योगधंद्यांच्या विकेंद्रीकरणावर करावी लागेल. युगोस्लाव्हिआंत ग्रामीण उद्योगधंद्यांची आणि लहान लहान शहरांची आवश्यकता प्रतिपादिली जाते असें मला आढळून आलें."

यापेक्षांहि "युगोस्लाव्हिआंत मला तात्त्विक विचारविकासाच्या दृष्टीनें जी अगदीं नवीन आणि अनपेक्षित गोष्ट आढळली ती म्हणजे शासनसंस्थेच्याच नव्हे तर कम्युनिस्ट पक्षाच्या विसर्जनाची आवश्यकता ! युगोस्लाव्हिआचे तरुण नेते कॉ. व्लाडिमिर देदियेर यांच्याकडून हा नवीन विचार मीं प्रथम ऐकला. युगोस्लाव्हिआंत देदियेर यांना मानाचें स्थान आहे. स्वातंत्र्यलढ्यांत ते टिटोबरोबर होते. ते म्हणाले, 'कम्युनिझमच्या प्रस्थापनेसाठीं कम्युनिस्ट पक्षाच्याहि विसर्जनाची आवश्यकता आहे. आम्हांला बहुपक्षीय अगर एकपक्षीय लोकशाही नको. खरी लोकशाही अपक्षीय असली पाहिजे.'

"हा विचार खुद्द मार्शल टिटो यांनींहि मजपाशीं बोलून दाखविला. कम्युनिस्टांची हुकुमशाही आणि लोकशाही यांचे विकासशील संबंध मला समजावून सांगतांना टिटो म्हणाले : 'कम्युनिझमच्या प्रस्थापनेसाठीं कम्युनिस्ट पक्षाचेंहि अखेरीस विसर्जन झालें पाहिजे. आम्ही विकेन्द्रीकरणाच्या प्रयोगानें शासनसंस्थेच्या विसर्जनास सुरुवातहि केली आहे. पण आम्हीं पक्षाच्या विसर्जनावरहि दृष्टि केंद्रित केली पाहिजे.'...'जनता-आघाडीचा कार्यक्रम हाच पक्षाचा कार्यक्रम. कम्युनिस्ट पक्षाला वेगळा असा कार्यक्रम नाहीं' असे उद्‌गार मार्शल टिटो यांनीं वेळोवेळीं काढलेले आहेत...स्टॅलिनवादाच्या फॅसिस्ट प्रवृत्तीला हा विचार मुळींच मानवणारा नाहीं. मार्शल टिटोचे हे विचार लेनिनवादाशीं विसंगत आहेत हें सिद्ध करण्यासाठीं लेनिन-स्टालिनचीं वचनें उद्‌धृत करण्यांत येत असतात.

युगोस्लाव्हिआंतील "हा नवा विचार म्हणजे मार्क्सवादाचा अभिनव विकास आहे, हेंहि उघड होय. तो लेनिनच्या भूमिकेला धरून नसेल, पण मार्क्सच्या मूलभूत शिकवणुकीशीं तो अधिक सुसंगत आहे...'कम्युनिस्ट जाहिरनाम्यां'त मार्क्सनें स्वच्छ म्हटलें आहे कीं, '(१) इतर कामगारपक्षांशीं विरोधी असा स्वतःचा वेगळा पक्ष कम्युनिस्ट स्थापन करीत नाहींत. (२) सबंध कामगारवर्गाच्या हितसंबंधापेक्षां वेगळे अगर विरुद्ध स्वरूपाचे असे हितसंबंध कम्युनिस्टांचे नाहींत. (३) कामगारचळवळीला वळण लावण्यासाठीं अगर तिला आकार देण्यासाठीं ते आपलीं स्वतंत्र, पंथविशिष्ट अशीं तत्त्वें मांडीत नाहींत.' अपरिहार्य अशा ऐतिहासिक परिस्थितीनें स्वतंत्र स्वरूपाच्या कम्युनिस्ट पक्षाची प्रस्थापना अपरिहार्य झाली असें मानलें, तरी त्या पक्षाच्या विसर्जनाचें ध्येय बाळगणें हेंच मार्क्सच्या मूलभूत भूमिकेस धरून आहे."

## ग्रेट ब्रिटनचे इराणशीं आणि ईजिप्तशीं संबंध

हिंदुस्थानांत ब्रिटिशांच्या सत्तेचा जम बसायला त्यांना शहाजहानकडून मिळालेल्या सवलती कशा कारण झाल्या तें आपणांस माहीत आहेच. इराणांतहि त्यांचा तसाच डाव होता. पण तो साधला नाहीं. राणी एलिझाबेथच्या काळांतच ॲन्टनी जेन्किन्स नामक इंग्रज व्होल्गा नदी व कास्पियन समुद्र यांच्या मार्गें इराणांत आला. त्याला राणीनें 'आमच्या इंग्रज व्यापाऱ्यांना मालाची ने-आण करावयास व व्यापार करावयास' सवलती मिळाव्यात म्हणून बोलणीं करावयास पाठविलें होतें. पण बादशहा शाह तहमास्प यानें त्यांना 'काफीर' म्हणून हांकून लावलें. (सुरुवातीला जसा फटका त्यांना बसला तसाच शेवटीं मुसादिकनेंहि फटकाच दिला !) पण पुढें शाह तहमास्पचा वारस शाह अब्बास यानें त्यांना इराणांत बोलावलें. त्यापूर्वी शंभर वर्षें पोर्तुगीजांनीं आपला जम पर्शिअन आखातांतील हार्मुझ बेटांत बसविला होता. इंग्रजां-









च्या मदतीनें शाह अब्बासनें त्यांना तेथून हांकून काढलें. तेव्हांपासून तुकतीच आबादानहून पीछेहाट करीपर्यंत ब्रिटिशांचें प्रस्थ तेथें स्थिर झालें होतें. १५९८ सालीं सर ॲन्टनी व सर रॉबर्ट शर्ली हे दोघे भाऊ इराणांत एका लष्करी तज्ज्ञाला घेऊन गेले व त्यांनीं शाह अब्बासच्या सैन्याची पुनर्घटना करून त्यांच्याकरवीं अजिंक्य समजल्या जाणाऱ्या तुर्कांचा पराभव केला. याप्रमाणें इराणचें धार्मिक व राजकीय स्वातंत्र्य इंग्रजांमुळें अबाधित राहिलें. अजूनपर्यंत इराणचा राग तुर्की व रशियन आक्रमकांवर होता. आतां मात्र तो ब्रिटिशांवरच उलटला आहे.

इराणप्रमाणेंच ईजिप्तकडूनहि ब्रिटनला फटका बसत आहे. पण इराणमधून त्यांनीं काढता पाय घेतला असला तरी सुएझ कालव्यावर मात्र तो पक्का रोवून ठेवलेला आहे. त्यांच्या या धोरणाची पार्श्वभूमि म्हणून कालव्याच्या सुरुवातीची हकीगत समजून घेण्यासारखी आहे.

गंमत अशी कीं, लेसेप्स्नें कालव्याची कल्पना प्रत्यक्षांत आणायला सुरुवात केली तेव्हां ब्रिटिशांनीं तो फ्रेंच असल्यामुळें त्याला विरोध केला. पण कालवा पुरा झाल्यावर मात्र शहाणपणा करून त्यांनीं लेसेप्सचें अभिनंदन केलें. महाराणी व्हिक्टोरिआनें त्याला 'ग्रॅन्ड क्रॉस ऑफ् दि ऑर्डर ऑफ् दि स्टार ऑफ् इंडिया' हा किताब दिला.

या कालव्याच्या कंपनीचें भांडवल कांहीं फ्रेंचांचें व कांहीं ईजिप्तचा राजा खेदिव याचें होतें. हा खेदिव फारच खर्चिक होता. त्याला दरसाल ७० लक्ष पौंडांचें कर्ज होत गेलें. कर्जातून मोकळीक होण्यासाठीं त्यानें सुएझ कॉलवा कंपनीचे शेअर्स प्रथम जामीन म्हणून देऊं केले व पुढें विकत देण्याचीहि इच्छा दाखविली. त्या वेळचा ब्रिटिश मुख्य प्रधान डिझरायेली हा फार दूरदृष्टीचा होता. त्यानें ब्रिटिश सरकारसाठीं ते सर्व भाग खरेदी केले. अशा रीतीनें इंग्लंडला जवळजवळ निम्मा हिस्सा प्राप्त झाला. १८८८ सालीं कान्स्टांटिनोपल येथें ग्रेट ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया, हंगेरी, इटली, रशिया, स्पेन, तुर्कस्थान आणि नेदर्लंडस् यांमध्यें या कालव्याच्या आंतरराष्ट्रीय सत्तेबाबत करारनामा झाला. त्या वेळीं तुर्कस्थान हें या कराराच्या पालनासाठीं जामीन होतें. पहिल्या महायुद्धानंतर इंग्लंड जामीन म्हणून स्वीकारलें गेलें. या आधारावरच इंग्लंडनें सुएझ कालव्याच्या कांठावर सैन्य ठेवलें असून तें हलविण्यास नकार दिला आहे. या करारांचें पहिलें कलमच वादाचा विषय झालें आहे. त्याचे शब्द असे आहेत :

"हा सुएजचा कालवा शांततेच्या कालांत किंवा युद्धकालांत सर्व व्यापारी व लष्करी जहाजांना मोकळा व अनिर्बंध ( free and open ) राहील व कोणत्याहि राष्ट्राचें निशाण असलें तरी त्याला हरकत घेतली जाणार नाहीं."

### मानववंशशास्त्राची हिंदुस्थानांतील प्रगति

हिंदुस्थानांत या मानववंशशास्त्राची काय स्थिति आहे व त्या शास्त्राची मध्यवर्ती संस्था काय काय करते याविषयीं जगद्विख्यात मानववंशतज्ज्ञ डॉ. व्हेरिअर एल्विन् यांनीं एक लेख 'इलस्ट्रेटेड वीकली'च्या नोव्हेंबर २५ च्या अंकांत लिहिला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

"हिंदुस्थानांत मानववंशशास्त्राची प्रस्थापना व्हावयास फार काळ लागला. फक्त परकीय अधिकाऱ्यांनीं हा व्यवसाय करावयाचा व एकाद्या प्राणिसंग्रहांत किंवा वस्तुसंग्रहांत रानटी लोक त्यांनीं ठेवावयाचे, अशीच चुकीची समजूत प्रथम होती ! यांत एक शरच्चंद्र रॉय या महान् संशोधकाचा अपवाद आहे. हिंदी सरकारनें भूगर्भविद्या, वनस्पतिविद्या, आणि पुराणवस्तुसंशोधन या शास्त्रांवर खूप खर्च चालू केला होता, पण मानववंशशास्त्राला मात्र प्राणिशास्त्रीय पाहाणीखात्याच्या एका छोट्याशा उपविभागाचें स्थान दिलें होतें ! जणुं हिंदी मानवप्राण्याची जागा तेथें इतर जनावरांशेजारीं होती !

"हें सर्व बदलून टाकून नवीन जोमाचे संशोधक तयार करण्याचें व हिंदी सरकारच्या मदतीनें एक मोठें मानवसंशोधनकेन्द्र प्रस्थापित करण्याचें महान् कार्य डॉ. बी. एस्. गुह यांनीं केलें. रिस्लेच्या हिन्दी मानववंशाबद्दलच्या कार्यानंतर यांचेंच कार्य आंतरराष्ट्रीय कीर्ति पावलें आहे. त्यांचा येथील लोकांत








नेग्रिटो वंशाचें मिश्रण असल्याचा शोध, त्यांचें पूर्व काफिरिस्तानांतील काम, हराप्पा शहरीं सांपडलेल्या पुरातन मानवी अवशेषांचें त्यांनें संशोधन—हें सर्व कार्य युगप्रवर्तक ठरलें आहे. त्यांचें सर्वांत श्रेष्ठ कार्य म्हणजे मात्र त्यांची कलकत्ता तेथील मानववंश-शास्त्राची प्रयोगसंस्था होय. आशियांतील सर्वश्रेष्ठ (psychometric) मानस-मितिशास्त्रीय प्रयोग-शाळा बहुधां हीच असावी. ही प्रयोगशाळा कलकत्त्यास 'इन्डियन म्युझिअम'च्या मोठ्या इमारतींत आहे. हेंच हिंदी सरकारचें 'डिपार्टमेन्ट ऑफ अॅन्थ्रापॉलॉजी' होय.

"या डिपार्टमेन्टचें कार्य तीन मुख्य शाखांत वांटलेलें आहे. (१) पहिली शाखा भौतिक मानववंशविद्या आणि जीवशास्त्र यांची आहे. मानवीप्राण्यांची मोजमाप घेण्याचीं साधनें, रक्त-तपासणीची साधनसामग्री आणि क्ष—किरणाची यंत्र-सामग्री तेथें आहे. तसेंच आहारांतील सत्त्वांश अभ्यासण्यासाठीं जीव-रसायनाची मोठी प्रयोग-शाळा आहे, आणि एक अत्यंत वेधक अशी खोली जुन्या हाडांचा अभ्यास व संरक्षण करण्याठीं राखून ठेवलेली आहे. हराप्पा येथील उत्खननांत इतर पुराणवस्तूंप्रमाणेंच मानवी अवशेषहि मिळाले व त्यांचें संशोधन डॉ. गुह यांनींच केलें. (२) दुसऱ्या शाखेंत सांस्कृतिक व सामाजिक मानववंश-विद्याविषयक संशोधन होतें. धर्म,कुटुंब, वन्य जमाती, शेती, करमणुक, गुन्हे, लोकसाहित्य, राज्यव्यवस्था वगैरे गोष्टींचा येथें अभ्यास होतो. वन्य जमातींच्या भाषांचा बिनचुक अभ्यास व्हावा म्हणून खात्यानें वेन्स्टर व ऑरिकॉन वायर् रेकॉर्डर्स् विकत घेतले असून त्यांमुळें आदिकालीन संगीत व भाषिक उच्चारण यांच्या ध्वनिमुद्रिका घेतल्या जातात. हिंदुस्थानांतील विविध वन्य जमातींच्या वसतींत महत्त्वाचीं 'क्षेत्र-निरीक्षणें' (field-surveys) त्यांनीं केलीं आहेत. खालचा जौनसार-बोवार प्रदेश, ओरिसाचे पहाड यांतील जमाती, त्रावणकोरच्या पहाडी जमाती, आसाममधील कोहिया व आबोर पहाडांतील जमाती आणि अन्दमान बेटांतील जमाती यांचीं अशीं निरीक्षणें झालीं असून अन्दमानमध्यें तर या खात्याचें एक उपकेन्द्रच सुरू झालें आहे. (३) तिसरी शाखा म्हणजे बाह्य शारीरिक, सामाजिक मोजमापांप्रमाणेंच मानसिक मोजमापें घेण्यासाठीं सुरू झालेली एक प्रयोगशाळा होय. Rorschach, Thematic Apperception आणि Horns Hellberger यांसारख्या कसोटीच्या पद्धतींचें हिंदी परिस्थितीला अनुकूल असें स्वरूप तयार केलें आहे. हीं सर्व मोजमापें म्हणजे अजस्र व गुंतागुंतीचीं गणितेंच असतात. त्या गणनासाठीं यांत्रिक साधनसामग्री असून त्यांतून त्या गणितांचे चमत्कार आपणांला दिसून येतात.

"या खात्याचें ग्रंथालय समृद्ध आहे. प्रथम तेथें १५०० ग्रंथच होते. आज त्या ठिकाणीं १६००० ग्रंथ असून १५० नियतकालिकें येतात. याशिवाय म्यूझिअमच्या 'एथ्नोग्राफिक गॅलरीज' (मानववंशशास्त्राचें चित्रमंदिर) या विभागाचें संचालन हें खातेंच करतें.

"या खात्यानें एक उत्तम गोष्ट ही केली आहे कीं, घाईघाईनें आपली माहिती छापून टाकली नाहीं! कारण घाईघाईनें छापून काढलेलें दुय्यम दर्जाचें लिखाण या देशाइतकें इतरत्र क्वचितच प्रसिद्ध झालें असेल! तथाकथित मानववंशतज्ज्ञ (!) अशा विभागांत कांहीं आठवडे राहतात, कांहीं तरी चुकीचीं मापें घाईघाईनें घेतात, प्रमुख प्रश्न तेव-ढेच बरेचसे विचारतात आणि आपल्या विद्यापीठांत बसून मोठमोठे भारदस्त लेख लिहून आपल्याला न गवसलेल्या गोष्टीहि सांगत सुटतात! पण कलकत्ता येथील मानववंशशास्त्रीय संशोधन-खात्याचीं अनुमानें ताळा पटून बिनचुक ठरल्यावर या प्रयोग-शालेला आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळेल याविषयीं मला शंका नाहीं. हिंदी सरकारनें राजकीय क्षेत्रांतील विज्ञानविषयक प्रतिकूल वातावरणास न जुमानतां या खात्याची उभारणी चालविली हें त्यास खचित अभिनंदनीय आहे."

## प्राक्–ऐतिहासिक कालनिर्णयाची नवीन पद्धति

फार प्राचीन काळापासून माणसें पृथ्वीचें वयोमान, जीवतत्त्वाची पहिली सुरुवात आणि मानवाची निर्मिति यांविषयीं अत्यंत तीव्र जिज्ञासा दाखवीत आहेत. या गोष्टींचा निर्णय करायला

साहाय्यभूत अशी एक नवीन विज्ञानशाखा विकास पावत आहे. तिचें नांव भू-कालमापक-शास्त्र, (Geochronology) आहे. भूकाल-मापनशास्त्रज्ञ भूतकालाच्या वर्षनिर्णयासाठीं जीव-शास्त्रीय, भूगर्भशास्त्रीय, खगोलशास्त्रीय किंवा भौतिकशास्त्रीय पद्धतींचा उपयोग करतात.

प्रो. एफ. ई. झायनर् या लंडन युनिव्हर्सिटी-तील 'Environmental Archaeology' च्या प्राध्यापकांनीं बी. बी. सी. वरून ध्वनिक्षेपित केलेल्या एका भाषणांत, भौतिकशास्त्रांतील रेडिओ-ॲक्टिव्हिटीच्या शोधामुळें या भूकालमापनांतहि कशी क्रांति घडून आली आहे याचें दिग्दर्शन केलें आहे. (यांचें 'डेटिंग द पास्ट' हें पुस्तक प्रसिद्ध असून त्याची नवीन आवृत्तीहि नुकतीच प्रसिद्ध झाली आहे). या शास्त्रज्ञाचें मुख्य लक्ष लांकूड व.फॉसिल्स म्हणजे प्रस्तरीभूत अस्थिपंजर यांमध्यें आढळणाऱ्या रेडिओ-ॲक्टिव्ह (किरणो-त्सर्जक) कार्बन[१४] या मूलतत्त्वाच्या मापाच्या किंवा प्रमाणाच्या अनुरोधानें कालमान ठरविण्याकडे विशेष आहे. यामुळें २०,००० वर्षांइतक्या अलीकडच्या काळाचीहि कल्पना करतां येते. त्यांच्या भाषणांतील उतारे 'सायन्स ॲन्ड कल्चर' मासिकाच्या ऑक्टोबर (१९५१) च्या अंकांत आलेले आहेत. त्यांतून पुढील माहिती संकलित केली आहे :

" ही नवीन पद्धति वनस्पति व प्राणी यांच्या शरीरांतील सूक्ष्मतम धाग्यांतील रेडिओ-ॲक्टिव्ह कार्बनच्या अस्तित्वावर आधारलेली आहे. चिकागो युनिव्हर्सिटींतील डॉ. लिब्बी, डॉ. ॲन्डरसन् आणि डॉ. अर्नोल्ड यांनीं ह्या पद्धतीचा विकास केला आहे, व तिच्यामुळें सुमारें २०,००० वर्षांपर्यंतचा काळ मापला जाऊं शकतो.

" वातावरणाच्या वरच्या थरांतील 'विश्वकिरण' (cosmic rays) न्यूट्रॉनचे कण निर्माण करतात व त्यांचा आघात नेहमींच्या नायट्रोजनवर होऊन त्याचें १४ अणुभाराच्या कार्बनमध्यें रूपांतर होतें. नेहमींच्या कार्बनचा अणुभार १२ आहे. वातावरणांत असलेल्या कार्बन-डाय-ऑक्साइड या वायूच्या निर्मितींत या दोन्ही कार्बन तत्त्वांचा भाग असतो ही महत्त्वाची गोष्ट आहे. वातावरणांतील कार्बन-डाय-ऑक्साइड वायू शोषून वनस्पती आपल्या शरीरांतील धागे घडवितात. त्यामुळें वातावरणांतील कार्बन[१४] या मूलतत्त्वाचें शोषणहि त्याच प्रमाणांत या धाग्यांत झालेलें असतें. ज्याअर्थी सर्व प्राणी प्रत्यक्षपणें वनस्पति खाऊन किंवा अप्रत्यक्षपणें म्हणजे वनस्पतिभक्षक प्राण्यांची शिकार करून आपल्या शरीरांतील सत्त्व तयार करीत असतात, त्याअर्थी सर्वच सजीव व सावयव (organic) पदार्थांत कार्बन[१२] या नेहमींच्या कार्बनबरोबरच कार्बन[१४] हें मूलतत्त्वहि असलें पाहिजे.

"'कार्बन[१४]' हें मूलतत्त्व अधिक वजनदार व किरणोत्सारी (रेडिओ-ॲक्टिव्ह) आहे. त्यांतून इलेक्ट्रॉन् किंवा 'बीजक' कण निघून त्यांचें विकलन होतें व त्या अणूंचें पुन्हां नायट्रोजन बनतें. अशा रीतीनें कार्बन[१४] हें मूलतत्त्व अदृश्य होतें. परंतु याचें नेहमींच्या कार्बन[१२] या मूलतत्त्वाशीं असणारें प्रमाण (ratio) खरें महत्त्वाचें आहे. रेडिओ-ॲक्टिव्ह कार्बन[१४] या मूलतत्त्वाचा अमुक एक भाग पूर्वी असला तर ५७०० वर्षांनीं त्याचा अर्धा भाग उरलेला असेल असें या विकलनाचें प्रमाण सिद्ध झालेलें आहे. म्हणून ५७०० वर्षें हा कार्बन[१४] या मूलतत्त्वाचा 'अर्धजीवनकाल' (half life-period) होय. या 'अर्धजीवनकाला'च्या तुलनेनें कोणत्याहि वनस्पतीचें जीवनमान अगदीं क्षुद्र म्हणावें लागतें. शिवाय ती वनस्पति या रेडिओ-कार्बनचे परमाणु पुनः पुनः शोषीत असते. परंतु मृत वनस्पतींच्या बाबतींत तसें नसतें. त्यांत नवीन रेडिओ-कार्बन समाविष्ट होत नाहीं म्हणून प्रस्तरीभूत मृत वनस्पतींतील नेहमींचा कार्बन तसाच राहून रेडिओ-कार्बन मात्र कमी कमी होत जातो. जिवंत वनस्पतींत ज्या प्रमाणांत हे दोन्ही कार्बन असतात त्याच्या निम्मा रेडिओ-कार्बन या मृत वनस्पतींत, ५७०० वर्षें मृतावस्था झाल्यावर आढळेल, आणखी ५७०० वर्षांनीं मूळ रेडिओ-कार्बनचा ¼ भाग सांपडेल.

" यामुळेंच प्रस्तरयुगांतील एखादें लांकडी अवजार, हजारों वर्षांपूर्वी पेटविलेल्या शेकोटींतील एखादा लांकडी कोळशाचा भाग, कांस्ययुगांतील








एखाद्या माणसानें एखाद्या प्राण्याच्या चामडीपासून कमावलेल्या कातड्याचा तुकडा किंवा एखाद्या प्रागैतिहासिक घरठाणावर उगवलेली प्रस्तरीभूत झुडपें, शेवाळ वगैरे यांमधील रेडिओ-कार्बनच्या तौलनिक प्रमाणावरून त्यांचें प्रागैतिहासिक वयोमान अजमावतां येतें. अर्थातच अजून ही पद्धत जिकीरीचीच आहे. पण यांत हळूहळू सुधारणा होत जाईल. अजून निश्चित वर्षांच्या अनुमानाइतका बिनचुकपणा यांत आलेला नाहीं. इतर कोठल्याहि मार्गानें ज्याचा प्रागैतिहासिक काल अजमावणें अशक्य असेल तेथें या पद्धतीचा उपयोग तर अपरिहार्यच आहे. या पद्धतीनें संशोधन केल्यावरच आपणांस कळून आलें आहे कीं, अमेरिकन भूखंडावर मानवाचा प्रसार सुमारें १०,००० वर्षांपूर्वीं झाला असावा.

मध्ययुगीन ‘ किमये ’ चें स्वरूप

प्रो. जॉन् रीड्, एफ. आर. एस्. यांच्या एका भाषणाचा सारांश ‘ नेचर ’ या प्रसिद्ध इंग्लिश साप्ताहिकाच्या नोव्हेंबर ३, १९५१ च्या अंकांत ‘ किमया व किमयागार ’ या नांवानें आला आहे. त्यांतून पुढील मनोरंजक माहिती घेतली आहे :

“ किमया म्हणजे केवळ हलक्या धातूंचे किंमती धातू बनविण्यासाठीं करण्यांत आलेले रासायनिक प्रयत्न, एवढेंच आपण मानतों; पण खरोखर त्यामागें एक मोठें तत्त्वज्ञान होतें. सृष्टि आणि जीवजात यांच्या रहस्याचा तलास लावण्याचा तो एक प्रयत्न होता. माणसांतील सूक्ष्मतम घटक आणि विश्वांतील सूक्ष्मतम घटक यांच्यांतील साधर्म्य शोधण्याचा तो प्रयत्न होता. एका निर्जीव पदार्थाचें दुसऱ्या निर्जीव पदार्थांत रूपांतर करण्याचा प्रयत्न हें त्याचें केवळ एक आनुषंगिक कार्य होतें.

“ किमयेमागील तत्त्वें पुढीलप्रमाणें होतीं : ( १ ) भौतिक द्रव्याचे सर्व प्रकार मुळांत एकरूपच आहेत. ( २ ) हीं रूपें उत्क्रान्तिमय क्रियांतून विकास पावतात; ( ३ ) द्रव्यांत एक सर्वसामान्य आत्मतत्त्व असून तेंच अविनाशी आहे. शरीर किंवा बाह्यरूप हें आत्माविष्काराचें केवळ साधन असून नश्वर आहे व त्याचें रूपांतर ( transmutation ) करतां येईल. ह्या सर्व तत्त्वांचा विचार न करतां अर्वाचीन भौतिक शास्त्रांतील तात्त्विक विचारांशीं त्यांचें असलेलें साम्य चटकन् ध्यानांत भरतें. लार्ड रूदरफर्ड यांनीं तर या नवीन भौतिक तत्त्वांना ‘ आधुनिक किमया ’च म्हटलें आहे, कारण त्यामुळें मूलतत्त्वांचीं रूपांतरें शक्य कोटींत आलीं आहेत.

“ किमयागारांची देवता ग्रीसमध्यें ( Hermes Trismegistos ) ‘ तिप्पट महान् हर्मिस् ’ हा होता. पूर्वींच्या इजिप्शियन Thoth देवतेचें हें ग्रीक रूपान्तर होय. या ‘ हर्मेटिक ’ कलेचा निर्माता तोच देव होय. किमयेची मूळ सुरुवात ईजिप्तमध्यें, म्हणजे ‘खेम’ या नांवानें ओळखल्या गेलेल्या देशांत झाली असें बहुधां मानलें जातें.

“ किमयेच्या मूलभूत सिद्धान्तांत चार गुणधर्म व चार मूलतत्त्वें मानलीं होतीं. अग्नि, पृथ्वी, जल व हवा हीं मूलतत्त्वें आणि उष्ण, शुष्क, शीत व आर्द्र हे गुणधर्म होत. अग्नि हा उष्ण व शुष्क; पृथ्वी शुष्क व शीत; जल शीत व आर्द्र; हवा आर्द्र व उष्ण, तसेंच अग्नि ही शक्ति ( energy ) आणि पृथ्वी, जल व हवा हीं घन, द्रव व वायुरूप मूलतत्त्वें अशीहि योजना यांत आहे. हा सिद्धान्त ॲरिस्टॉटलशीं निगडित असला तरी त्याचें मूळ ( खिस्तपूर्व १५०० वर्षें ) ईजिप्त व हिंदुस्थान यांतहि आढळतें. भौतिक विज्ञानासंबंधींचा हा सर्वांत जुना सिद्धान्त असून तो या ना त्या स्वरूपांत सर्वत्र अस्तित्वांत होता. या सिद्धान्ताप्रमाणें जलतत्त्व शीत व आर्द्र असतांहि उष्ण व शुष्क अशा हवेंत रूपान्तर पावतें. या कल्पनेच्या बुडाशीं ‘ ट्रॅन्स्म्यूटेशन ’ किंवा ‘ मूलतत्त्वान्तर हा उपसिद्धान्त होता.

“ आदिकालीन विचारसरणींत द्वन्द्व-सिद्धान्त ( Doctrine of Two Contraries ) प्रमुख असे. त्याचेंच हें रूप आहे. यालाच पुढें मुस्लीम राष्ट्रांतील किमयागारांनीं इ. स. ९ व्या शतकांत गंधक-पारा या द्वन्द्वाचें स्वरूप दिलें. या भूगर्भांतील दोन तत्त्वांचा संशुद्ध स्वरूपांत संयोग झाल्यास त्यांतून सुवर्ण निघतें, किंचित् अशुद्ध अवस्थेंत तीं एकत्र केल्यास रुपें होतें व फारच अशुद्ध अस-








त्यास त्यांतून बाकीच्या हलक्या धातू होतात असें मानलें जाई. याच दोन तत्त्वांचें परम-संशुद्ध स्वरूप सिद्ध झाल्यास त्याच्या संयोगांतून असें एक तत्त्व निर्माण होतें कीं, त्याच्या अंशमात्र विभागामुळेंहि स्पर्श होतांच हलक्या धातूंचें सोनें व्हावें. हाच मध्ययुगीन 'परीस' किंवा 'पारसमणि' किंवा 'स्पर्शमणि' होय. या दोन मूलतत्त्वांचीच सूर्य व शशिकला पुल्लिंगी व स्त्रीलिंगी, चल व अचल, दाता व भोक्ता, स्थिर व चर, बिनपंखी सिंह व सपंख सिंहीण अशीं प्रतीकमय रूपें असत. गंधक हा पुरुष व पारा ही स्त्री यांच्यापासून परीसरूपी बालकाचा जन्म झाल्याचेंहि प्रतीक उपलब्ध आहे.

"सोळाव्या शतकापर्यंत किमयेचा मुख्य उद्देश सोनें निर्माण करणें हा होता. पण सोळाव्या शतकांत पॅरासेल्सस् यानें गंधक व पारा यांत तिसरें लवण किंवा मीठ संयुक्त केलें आणि किमयेचा उपयोग औषधिरसायनाकडे करणें योग्य असें प्रतिपादन केलें. किमयेला आतां नवीन ध्येय प्राप्त झालें. जुन्या गॅलेनिक वैद्यकांतून नवें वैद्यक निर्माण करण्याचा तो प्रयत्न होता. या दृष्टीनें पॅरासेल्ससचें स्थान ल्यूथर, कोपर्निकस् व कोलंबस या महान् समकालीनांच्या बरोबरीचें आहे. यानंतर अठराव्या शतकापर्यंत हा वैद्यक-रसायनाचा काळ होता व त्या काळांतच किमयेचा ऱ्हास होत होत तिचें प्रभुत्व नष्ट झालें."

---

## महाकवीची अमर वाणी

मी किती तरी वेळां म्हटलें आहे कीं, ज्याप्रमाणें हवा, पाणी, प्रकाश ईश्वराची देणगी आहे. आणि त्यांत कांहीं भेदभाव केला जात नाहीं, त्याचप्रमाणें जमीन देखील ईश्वराची देणगी आहे. हा विचार हिंदीचे महाकवि मैथिलीशरण गुप्त यांनीं खालील कवितेंत चांगल्या प्रकारें प्रकट केला आहे. ही लहानशी कविता भूमिदानयज्ञावर लिहिलेली आहे.

प्रभुने जिस दिन दिया शरीर
दिये उसी दिन हमे दया कर
भू नभ पावक नीर समीर ।।
अबभी नभमें रविशशिहास
अग्नि उष्ण, जल शीत सुवास
और पवनमें श्वासोच्छ्वास ।
किंतु भूमिगाथा गंभीर
प्रभुने जिस दिन दिया शरीर ० ।।
भूपर कहाँ हमारा ठौर ?
कहाँ हमारे मुंहका कौर ?
हम भी मनुज कहे क्या और ?
समझो मनुज, हमारी पीर ।
प्रभुने जिस दिन दिया शरीर ० ।।

—आचार्य विनोबा, ('सेवक' जानेवारी १९५२)








# आपल्या गणराज्याची घडण

लेखकः– आचार्य दादा धर्माधिकारी

•

आपल्या गणराज्याची घडण होत असतां घडलेल्या अनेक प्रसंगांचीं हृदयंगम वर्णनें आणि त्यांतील थोर मंडळींची उत्कृष्ट शब्द-स्वभाव-चित्रें या पुस्तकांत पत्ररूपानें आपणांस वाचावयास मिळतील. आपल्या खाजगी अथवा सार्वजनिक ग्रंथालयासाठीं आपली प्रत आजच मागवा.

मूल्य ३॥ रुपये : टपाल खर्च निराळा

•

सु ल भ रा ष्ट्री य ग्रं थ मा ला, पु णें २









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

Regd. No. B. 5177

## विक्रीस तयार!

‘नवभारत’ प्रकाशन : १ :

मूल्य दोन रुपये

# पंकज

[ लिन युथांग यांच्या कादंबरीचा अनुवाद ]

अनुवादिका : **प्रेमा कंटक**

•

एक विदुषी अनुवादिकेला या कादंबरीबद्दल लिहिते : “ कथा हृदयंगम आहे. नायिका वेश्या असल्याकारणानें तिची उदात्तता अधिकच हृदयाला भिडेल. तिचें पहिलें दर्शन झाल्याचें वर्णन वाचतांना महाश्वेता-पुंडरीकमीलनाचा आभास होतो. मराठी कथासाहित्यांत एका अमोलिक कथेची भर टाकलीस. ”

•

**प्राप्तिस्थळः—**

(१) श. म. देव, प्रकाशक : ‘नवभारत’ प्रकाशन, २९१ शनिवार, पुणें २.

(२) सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, टिळकरोड, पुणें २.